# नवभारत

ऑक्टोबर २०११

## कौरव-पांडवांमधले द्यूत :
## युधिष्ठिराचे उत्तरदायित्व (उत्तरार्ध)

## ग्रंथजिज्ञासा
## विभाजनाची अकथित कहाणी

## संजय उवाच --
## अण्णांच्या आन्दोलनाचा इत्यर्थ

अनुक्रमणिका









द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहाशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, य़ा नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६५ । अंक १। ऑक्टोबर २०११
आश्विन/कार्तिक शके १९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## ऑक्टोबर २०११

## अनुक्रमणिका

# कौरव-पांडवांमधले द्यूत : युधिष्ठिराचे उत्तरदायित्व (उत्तरार्ध)

अरुण विनायक जातेगांवकर

वासंती अरुण जातेगांवकर

युधिष्ठिर आणि त्याचे द्यूत ह्यासंबंधी व्यासांनी द्रौपदीच्या तोंडी चारचौघांत, तसेच खासगीत घातलेल्या गोष्टी लेखाच्या पूर्वार्धात पाहून झाल्या आहेत. आता, युधिष्ठिर आणि त्याचे द्यूत ह्यासंबंधी व्यासांनी पांडव-पक्षातल्या इतर प्रमुख कथापात्रांच्या तोंडी चारचौघांत, तसेच खासगीत घातलेल्या गोष्टींकडे वळूया.

प्रथम भीम.

द्यूतात कौरवांनी आपले राज्य लबाडीने जिंकले हे – पांडवपक्षातल्या इतर सर्वांसारखे – भीमालाही स्पष्ट असून त्याच्या तोंडी चारचौघांत तसे आलेही आहे. कौरवांनी केलेल्या द्रौपदीच्या विटंबनेचा खरा सूड तर भीमानेच उगवला आहे. तथापि, द्यूतात घडलेल्या गोष्टींच्या संबंधात युधिष्ठिर त्याला निर्दोषी दिसलेला नाही, असे दाखवणारे प्रसंगही कथेत आहेत.

त्या प्रकारचे दोन प्रसंग द्यूताच्या उत्तरवृत्तातच आहेत. द्यूतातला विसावा डाव संपल्यावर दुःशासनाने एकवस्त्रा द्रौपदीचे केस धरून तिला कुरुसंसदेत फरफटत आणली, आणि द्रौपदीच्या प्रश्नावरचा भीष्म व द्रौपदी ह्यांच्यामधला – लेखाच्या पूर्वार्धात येऊन गेलेला – संवाद संपला, त्या वेळची गोष्ट आहे. युधिष्ठिरावर संतापलेला भीम त्याला म्हणाला होता,

भवन्ति देशे बन्धक्यः कितवानां युधिष्ठिर।<br>
न ताभिरुत दीव्यन्ति दया चैवास्ति तास्वपि।।

२.६१.१

– युधिष्ठिरा, ह्या देशात जुगाऱ्यांकडे वेश्या असतात; पण त्यांनाही ते कधी पणाला लावत नाहीत. त्यांनाही अगदी तशा बायकांचीपण दया येते.

त्यानंतर, तू पणाला लावून घालवलेल्या बाकी कशावरूनही मला राग आला नव्हता असे युधिष्ठिराला सांगून, आणि

इदं त्वतिकृतं मन्ये द्रौपदी यत्र पण्यते। २.६१.४

– तू द्रौपदीला पणाला लावलेस हे माझ्या मते अती झाले. असे म्हणून भीम युधिष्ठिराचे हात जाळायला निघाला होता.

भीमाच्या ह्या उद्‌गारांच्या संदर्भात एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी : द्रौपदीला पणाला लावण्याचा युधिष्ठिराला अधिकार नव्हता, असे भीमाचे म्हणणे नाही. त्या वेळच्या प्रथेप्रमाणे युधिष्ठिराला तो अधिकार होता, हे महाभारतात कोणीही – खुद्द द्रौपदीनेही – कधी अमान्य केलेले नाही. भीम द्रौपदीच्या पणाकडे अधिकाराच्या संदर्भात पाहत नसून माणुसकीच्या व औचित्याच्या संदर्भात पाहतो आहे, हे त्याच्या उद्‌गारांवरून स्पष्ट आहे.

युधिष्ठिराचे हात जाळायला निघालेल्या भीमाला अर्जुनाने अडवले आहे. 'तू हे असे वागून शत्रूंची इच्छा पुरी करू नकोस', असे म्हणून अर्जुन पुढे म्हणाला आहे :

आहूतो हि परै राजा क्षात्रधर्ममनुस्मरन्।<br>
दीव्यते परकामेन तन्नः कीर्तिकरं महत्।।

२.६१.९

– शत्रूंनी (द्यूताचे) आह्वान दिल्यावर राजा (युधिष्ठिर) क्षात्र धर्माची आठवण ठेवून शत्रूंच्या इच्छेने खेळतो आहे. आपल्याला हे मोठे कीर्तिकारक आहे.

युधिष्ठिर द्यूत ज्या प्रकारे खेळला, त्याचे हे झाले पांडवपक्षाचे – ज्याला अधिकृत म्हणता येईल ते – स्पटीकरण. क्षात्र धर्म!

अर्जुनाचे म्हणणे ऐकल्यावर, आपले वागणे दुसऱ्यांना कसे दिसेल हे लक्षात येऊन की काय, भीमाने सारवासारव केली आहे. तो अर्जुनाला म्हणाला आहे :

एवमस्मिकृतं विद्यां यद्यस्याहं धनंजय।<br>
दीप्तेऽग्नौ सहितौ बाहू निर्दहेयं बलादिव ।।

२.६१.१०

– धनंजया, जर ह्याने स्वतःचा बडेजाव दाखविण्या-साठी हे केले असे मला वाटत असते, तर मी बलाने ह्याचे दोन्ही हात जुळवून प्रदीप्त अग्नीने जाळले असते.

भीमाने त्या वेळी जरी सारवासारव केली असली तरी युधिष्ठिराने द्रौपदीला पणाला लावले हे त्याला मुळीच आवडले नसल्याचे त्या प्रसंगी पुढेही दिसते. कुरुसंसदेत उभ्या असलेल्या एकवस्त्रा द्रौपदीला कर्णाने, "तुला आता पती राहिलेले नाहीत; जो तुला पणाला लावून दासी करणार नाही अशा दुसऱ्या कोणाला तरी पती म्हणून निवड", वगैरे म्हटल्यावरची भीमाची प्रतिक्रिया वैशंपायनांनी सांगितली आहे. भीम त्या वेळी युधिष्ठिराला म्हणाला आहे,

> नाहं कुप्ये सूतपुत्रस्य राज-
> न्नेष सत्यं दासधर्मः प्रविष्टः।
> किं विद्विषो वाद्य मां धारयेयु-
> र्नादेवीस्त्वं यद्यनया नरेन्द्र।। २.६३.७

– राजा, मी सूतपुत्रावर (कर्णावर) संतापत नाही. आपण आता दासधर्मात प्रवेश केला आहे, हे खरे आहे. पण, नरेन्द्रा, जर तू हिला (द्रौपदीला) पणाला लावून खेळला नसतास, तर आज मला थोपवणे शत्रूंना शक्य झाले असते का?

द्यूताच्या प्रसंगी भीमाने युधिष्ठिराला दिलेला दोष द्रौपदीला पणाला लावल्यावरून होता. तथापि, द्यूतात घडलेल्या गोष्टींपैकी भीमाला तेवढी एकच गोष्ट अडलेली नाही, हे द्रौपदी, भीम व युधिष्ठिर ह्यांच्यामध्ये आरण्यक-पर्वात झालेल्या विवादावरून उघड होते (३.२८-३७). त्या विवादाचा उल्लेख लेखाच्या पूर्वार्धात येऊन गेला असून पांडवांनी क्षात्र धर्माप्रमाणे कौरवांना तेज दाखवून राज्य परत मिळवण्यासाठी काहीतरी करायला हवे, हा त्यातला द्रौपदीचा मुद्दा लेखात येऊन गेला आहे. द्रौपदीचा मुद्दा डावलून युधिष्ठिर तिला 'क्षमा', 'धर्म' वगैरे गोष्टींवर व्याख्याने द्यायला लागल्याचे पाहिल्यावर युधिष्ठिरावर संतापलेला भीम द्रौपदीच्या बाजूने त्या वादात उतरतो. भीमाचे म्हणणे असे की, आपण कौरवांशी लगेच युद्धाला उभे राहावे. फार 'धर्म! धर्म!' करत बसण्यात काही अर्थ नसतो. पांडवांचे राज्य द्यूतात कपटाने हिरावून घेण्यावरून भीमाने त्या विवादात दुर्योधनाला दोष दिला आहे खरा; तथापि, त्याला फक्त दुर्योधनच दोषी असल्याचे दिसलेले नाही. भीमाने त्याच्या समोर बसलेल्या धर्मपुत्राला क्षात्र धर्माविषयी चार कडक शब्द सुनावून धर्मांचरणाच्या बाबतीत त्याचे कसे चुकते आहे हे सांगितलेले आहे, एवढेच नव्हे तर, द्यूतात घडलेल्या गोष्टींना भीमाने हात घातला आहे. त्याविषयीचे भीमाचे शब्द असे :

> भवतोऽनुविधानेन राज्यं नः पश्यतां हृतम्।
> अहार्यमपि शक्रेण गुप्तं गाण्डीवधन्वना।।
> कुणीनामिव बिल्वानि पङ्गूनामिव धेनवः।
> हृतमैश्वर्यमस्माकं जीवतां भवतः कृते।।
>
> ३.३४.६-७

– आम्ही तुझ्या आज्ञांचे पालन केल्यानेच अर्जुनाने रक्षिलेले – जे इंद्रालादेखील हरण करता येणे अशक्य होते ते – आपले राज्य आपल्या डोळ्यांदेखत हरण केले गेले. एखाद्या थोट्या माणसाची बिल्वफळे किंवा पांगळ्या माणसाच्या गाई (हरण केल्या जाव्यात) तसे आपले ऐश्वर्य आम्ही जिवंत असताना तुझ्यामुळे हरण केले गेले.[१]

युधिष्ठिराच्या आज्ञांचे पालन करण्यात आपले काही तरी चुकले, हा विचार भीमाच्या मनात कथेत इतरत्रही येऊन गेला आहे. तथापि, भीम प्रसंगोपात्त किती का कडवटपणे बोलला असेना, त्याने युधिष्ठिराच्या आज्ञेप्रमाणे न केल्याचा एकही प्रसंग महाभारतात नाही.

भीमाच्या दोषारोपांना युधिष्ठिराने दिलेले उत्तर लेखात पुढे येते आहे.

* * *

आता अर्जुन.

द्रौपदीला पणाला लावल्यावरून भीम जेव्हा युधिष्ठिराचे हात जाळायला निघाला होता, तेव्हा अर्जुनाने युधिष्ठिराच्या वागण्याचे 'क्षात्र धर्म !' हे समर्थन दिले होते, हे लेखात वर येऊन गेले आहे. युधिष्ठिराच्या वागण्याचे तसेच उदात्त समर्थन त्याने कथेत पुढे उद्योग-पर्वातही दिले आहे. कृष्ण पांडवांच्या बाजूने शिष्टाईसाठी कौरवांकडे जायला निघत होता, तेव्हाची गोष्ट आहे. पांडवपक्षातल्या साऱ्या सेनाप्रमुखांची बैठक भरली होती. त्या बैठकीत, 'शम की युद्ध?' ह्याविषयी इतर पांडवांसारखे अर्जुनानेही त्याचे स्वतःचे मत दिले होते. त्या भाषणात दुर्योधनाविषयी, 'युधिष्ठिराचे ऐश्वर्य पाहून त्या दुष्टात्म्याला ते सहन झाले नाही, आणि ते हरण करण्यासाठी कोठला धर्मसंमत मार्ग न दिसल्याने त्याने ते द्यूतात फसवाफसवी

करणाऱ्या शकुनीकडून द्यूतात हरण केले', असे म्हणून अर्जुन पुढे म्हणाला होता :

> कथं हि पुरुषो जातः क्षत्रियेषु धनुर्धरः।
> समाहूतो निवर्तेत प्राणत्यागेऽप्युपस्थिते।।
> अधर्मेण जितान्दृष्ट्वा वने प्रव्रजितांस्तथा।
> वध्यतां मम वार्ष्णेय निर्गतोऽसौ सुयोधनः।।
> ५.७६.१४-५

– क्षत्रियकुळात जन्माला आलेला कोण धनुर्धर पुरुष असा आहे बरे की, जो (शत्रूने) आह्वान दिल्यावर – (ते स्वीकारून त्याला सामोरे जाण्यात) आपले प्राण जातील असे दिसले तरी – माघार घेईल? कृष्णा, आम्हाला अधर्माने जिंकून वनात पाठवल्याचे दिसले, तेव्हाच दुर्योधन माझ्या हातून वधास पात्र झाला होता.

प्रस्तुत श्लोकांमध्ये अर्जुन अनुद्यूताविषयी बोलतो आहे, हे उघड आहे. त्या संदर्भात दोन गोष्टी प्रस्तुत आहेत. क्षत्रियांनी द्यूत खेळणे हे धर्मविरुद्ध नाही (द्यूत हा वेदविहित राजसूयाचा एक भाग आहे). दुसरे म्हणजे, अनुद्यूताच्या डावात शकुनीने कोठल्याही प्रकारची 'निकृति' – चलाखी किंवा फसवाफसवी – केल्याचे वैशंपायनांच्या तोंडी नाही. त्यामुळे, अर्जुनाला त्यात दिसलेल्या अधर्मा-मागचे कारण स्पष्ट होत नाही. 'आम्ही हरलो हाच, तुम्ही अधर्माने जिंकलात ह्याचा पुरावा आहे', किंवा 'तुम्हाला आमच्याहून द्यूत जास्त चांगले खेळता येते असे हेरून तुम्ही आम्हाला द्यूताचे आह्वान दिलेत, हाच अधर्म आहे', असलेच काहीतरी त्यामागे आहे. द्रौपदीने भीष्मांना दिलेल्या उत्तरामागचा भाव येथे आठवतो – आमच्या भोळ्या बाब्याला त्या ठकांनी गंडवले!

वरील प्रसंगी अर्जुनाने युधिष्ठिराच्या खेळण्याचे उदात्त समर्थन कितीका ठासून केले असेना, युधिष्ठिर व त्याचे द्यूत ह्याविषयीचे त्याचे  ते मत मनापासूनचे होते की चारचौघांत सांगण्यापुरते होते, असा संभ्रम पडतो. कारण, द्यूतात व अनुद्यूतात घडलेल्या गोष्टींचे उत्तरदायित्व अर्जुनाने सर्वस्वी युधिष्ठिराच्या पदरी झुकत्या मापाने घातल्याचा एक नाट्यपूर्ण प्रसंगही व्यासांनी कथेत पुढे - कर्णपर्वात – घातला आहे.

युद्धाच्या सतराव्या दिवशी घडलेल्या त्या प्रसंगी युधिष्ठिराला कर्ण समोर दिसतो आणि दोन कटू शब्द बोलून कर्णाला युद्धाचे आह्वान द्यायची दुर्बुद्धी त्याला सुचते. त्या वेळी, युधिष्ठिरचे संरक्षण करायला अर्जुन त्याच्या जवळपास नव्हता. स्वतःच्या हिमतीवर युधिष्ठिराने कर्णाशी युद्ध करायला जाणे हा, त्याने शकुनीशी द्यूत खेळायला जाण्यातलाच प्रकार होता. युधिष्ठिराच्या संरक्षणार्थ त्याच्या आजूबाजूला असलेल्या सर्व पांडव महारथ्यांचा पराभव करून कर्ण युधिष्ठिराला जखमी करतो; युधिष्ठिर जिंकला गेला आहे असे दर्शवण्यासाठी त्याच्या खांद्याला स्पर्श करतो; आणि त्याला तुच्छतेच्या सुरात, "तू क्षत्रिय कुळात कसा काय जन्माला आलास? पुन्हा वीरांशी लढायला जाऊ नकोस आणि त्यांना कटू बोलायला जाऊ नकोस", वगैरे ऐकवून सोडून देतो. अशा प्रकारे साऱ्या सैन्यासमोर कर्णाकडून मार खाल्यावर व फजिती करून घेतल्यावर थोड्या वेळाने युधिष्ठिर रणांगणातून पांडवांच्या छावणीतल्या स्वतःच्या डेऱ्यात परततो व तेथे गादीवर पडून राहतो.

काही वेळाने, अर्जुन व कृष्ण हे दोघे त्याची खबरबात घ्यायला म्हणून त्याच्या डेऱ्यात जातात. अर्जुन आपल्याला भेटायला आल्याचे पाहून युधिष्ठिराला वाटते की, तो कर्णाचा वध करून ती आनंदाची बातमी द्यायला आपल्याकडे आला आहे. युधिष्ठिर त्याला, कर्णाने साऱ्या सैन्यासमोर केलेल्या आपल्या अपमानाचे व फजितीचे वर्णन करतो; त्या अधमाचा वध केल्यावरून त्याचे तोंड भरून कौतूक करतो; आणि, ज्याच्या विचाराने गेली तेरा वर्षे माझी झोप उडाली होती त्या बलाढ्य कर्णाचा वध तू कसा केलास ते मला सांग, असे म्हणतो.

आता, त्या भेटीच्या वेळी अर्जुनाने कर्णाचा वध अजून केलेला नव्हता. त्याचे अश्वत्थाम्याशी नुकतेच मोठे युद्ध होऊन त्यात अर्जुनाने अश्वत्थाम्याला जबर जखमी केले होते. त्यानंतर जेव्हा कर्णाने भार्गवास्त्राचा प्रयोग करून पांडवसेनेचा सरसकट संहार आरंभला होता, तेव्हा तो अर्जुनाला सामोरा आला होता. खरे तर, त्या दोघांचे द्वैरथ – दोन रथ्यांमधले द्वंद्वयुद्ध – तेव्हाच घडायचे; पण अर्जुनाच्या त्या वेळच्या बोलण्यावरून कृष्णाने ताडलेले दिसते की, अर्जुनावर भार्गवास्त्राचा प्रभाव पडल्याने तो कर्णाशी द्वैरथाला उभे राहण्यास बिचकतो आहे. कर्णाला मारणे पांडवपक्षातल्या फक्त

अर्जुनालाच शक्य असल्याने त्या दोघांचे द्वैरथ कायमचे टाळणे शक्य नव्हते. तथापि, ते थोडे पुढे ढकलायला हवे असे वाटून कृष्ण अर्जुनाला सुचवतो की, त्या दोघांनी समरांगणातून तात्पुरते बाहेर पडून युधिष्ठिराला भेटायला जावे, आणि त्याला भेटून परत आल्यावर मग अर्जुनाने कर्णाला सामोरे जावे. अर्थात, त्या सूचनेमागचे कारण कृष्ण अर्जुनाला सांगत नाही.

युधिष्ठिराने अर्जुनाला विचारलेल्या प्रश्नाकडे वळूया. कर्णवधाविषयीच्या त्याच्या प्रश्नाला उत्तर म्हणून अर्जुन त्याला सांगतो की, नुकतीच माझी अश्वत्थाम्याशी मोठी लढाई झाली. त्यानंतर कर्ण मला सामोरा आला होता. पण त्याला डावलून मी तुझी खबरबात घ्यायला आलो आहे. आता परत जाऊन त्याच्याशी लढतो.

कर्णाचा वध झाला असे वाटल्याने युधिष्ठिर हर्षभरित झाला होता. अर्जुनाचे ते उत्तर ऐकून त्याचा अपेक्षाभंग तर झालाच; पण, त्याला अर्जुनाचा मोठा संतापही आला.

युधिष्ठिराच्या संतापामागे नुसता अर्जुनाच्या सद्यः-क्षणीच्या वागण्याविषयीचा अपेक्षाभंग नसून गेल्या सतरा दिवसांतल्या अर्जुनाच्या वागण्याविषयीचा अपेक्षाभंग आहे. कौरवपक्षात तीन अतिरथी होते : भीष्म, द्रोण व कर्ण. पांडवपक्षात अर्जुन एवढा एकच अतिरथी असल्याने त्या तिघांशी लढण्याची जबाबदारी अर्जुनाची होती. पण, भीष्मांना आणि द्रोणांना सामोरे जायचे अर्जुनाने शक्यतो टाळले होते आणि त्यामुळे त्या दोघांच्याही वधांच्या वेळी पांडवपक्षाची मोठी पंचाईत झाली होती. तथापि, त्या वधांच्या वेळचे अर्जुनाचे वागणे – काही प्रमाणात तरी – समजण्यासारखे होते म्हणून की काय, युधिष्ठिर त्यावरून अर्जुनाला काही बोलायला गेला नव्हता. कर्णाच्या बाबतीत तसले कोठलेच कारण नव्हते. त्यातून, अर्जुनाने कर्णवधाची प्रतिज्ञाही केली होती. त्यामुळे, कर्ण सामोरा येऊनही त्याच्याशी युद्ध करायचे अर्जुनाने टाळले, ह्याचा युधिष्ठिराने घेतलेला अर्थ असा : अर्जुन कर्णाला घाबरून पळून आला आहे. कर्णाने केलेल्या जखमांनी आणि फजितीने आधीच वैतागलेल्या युधिष्ठिराचा आता तोल जातो. तो अर्जुनाला असे काही सपाटून तोंड करतो की बास. त्याच्या मुक्ताफळांचे काही मासले असे : 'आपण द्वैतवनात असतानाच जर तू म्हणाला असतास की, कर्णाशी युद्ध करणे मला शक्य होणार नाही, तर पुढे काय करायचे ते आम्ही त्याप्रमाणे ठरवले असते; त्या वेळी कर्णवधाची प्रतिज्ञा करून तू आम्हाला शत्रूंसमोर उभे केलेस, आणि आता चांगले तोंडघशी पाडलेस.' 'तू असाच शूर आहेस आणि तसाच थोर आहेस, अशी तुझ्या जन्माच्या वेळी झालेली आकाशवाणी साफ खोटी होती; कर्णाला घाबरून पळून आलास त्यापेक्षा जन्मालाच आला नसतास तर बरे झाले असते.' हे सारे तावातावाने बोलताना युधिष्ठिराने दोन अपशब्दही वापरायला मागेपुढे पाहिलेले नाही. आता, रणातून वारंवार पळून गेलेल्या ह्या बहाद्दराने, रणातून पळून जाण्यावरून दुसऱ्या कोणाला तोंड करणे हा विनोद होता. युधिष्ठिराला ते, अर्थातच, दिसत नाही.

युधिष्ठिराने नुसते ह्याच प्रकारचे तोंड केले असते, तर त्यावरून अर्जुनाला संताप येण्यापलीकडे अधिक काही घडले असते, असे कथेवरून वाटत नाही. तथापि, अर्जुनाला घालूनपाडून तोंड करण्याच्या भरात युधिष्ठिर हेदेखील म्हणाला होता की, "ते तालमात्र गांडीव कशाला हातात धरले आहेस? देऊन टाक ते कृष्णाला आणि तू त्याचे सारथ्य कर! त्या धनुष्याने तो तरी कर्णाचा वध करेल." आता, 'गांडीव धनुष्य दुसऱ्याला देऊन टाक', असे जो कोणी मला म्हणेल त्याचा मी शिरच्छेद करीन, अशी अर्जुनाने प्रतिज्ञा केलेली असते. त्या प्रतिज्ञेनुसार अर्जुन आता युधिष्ठिराचा शिरच्छेद करायला तलवार उपसतो.

अर्जुनाने तलवार उपसलेली पाहून कृष्ण त्याला विचारतो की, तुझे हे काय चालले आहे? त्यावर, अर्जुन त्याला त्याची स्वतःची प्रतिज्ञा सांगतो; आणि, 'आता काय करावे?' असा प्रश्न विचारतो. कृष्णाने दिलेला सल्ला असा : 'थोर माणसांना अपमान हे मरणच असते; तेव्हा तू युधिष्ठिराचा किंचितसा अपमान कर की झाले.' कृष्णाचा सल्ला अर्जुनाला पटला आहे ..... प्रतिज्ञाही पाळली गेली, आणि भावाचा शिरच्छेद करणेही टळले! आणखी काय हवे?

आता, कृष्णाचे ऐकून अर्जुनाने युधिष्ठिराचा केलेला किंचितसा अपमान. 'किंचितसा' अपमान म्हणजे किती ते अर्जुनाला समजणार नाही असे वाटून की काय,





अर्जुनाने नेमके काय करायचे तेही कृष्णाने त्याला सांगितले होते. ते असे : "युधिष्ठिराशी नेहमीप्रमाणे बहुवचनात न बोलता थोडे एकेरीत बोल की काम झाले; तुझे एकेरीतले बोलणे ऐकले की, युधिष्ठिर मेल्यातच जमा आहे." अर्जुन युधिष्ठिराशी सामान्यतः आदबीने बोलणारा आहे. पण, एकदा बुद्ध्या अपमानच करायचा म्हटल्यावर, युधिष्ठिराचा संताप आलेल्या अर्जुनाला नुसत्या तुकारावर भागवता आलेले नाही. त्याने सलामीची फैरच झाडली आहे ती अशी : 'रणात पराक्रम गाजवणारा तो भीम मला युद्धावरून बोलला तर ते एक वेळ ठीक आहे; तू तर रणाच्या जवळपासही फिरकत नाहीस; आणि तू मला युद्धावरून बोलतोस?' त्यानंतर, अर्जुन युधिष्ठिराला - कधी नाही ते - असा काही ताडताड बोलला आहे की बास! उदाहरण म्हणून त्यातले हे त्रिष्टुभ पाहा :

अवामंस्था मां द्रौपदीतल्पसंस्थो
महारथान्प्रतिहन्मि त्वदर्थे।
तेनातिशङ्की भारत निष्ठुरोऽसि
त्वतः सुखं नाभिजानामि किंचित्।। ८.४९.८३

– मी तुझ्यासाठी महारथ्यांशी लढतो आहे, आणि द्रौपदीच्या गादीवर बसून तू माझा अपमान करतोस! भारता, तू शंकेखोर आणि निष्ठुर आहेस. तुझ्याकडून मला कधी किंचितही सुख लाभलेले नाही.

अर्जुनाच्या तोंडचा द्रौपदीचा उल्लेख अर्थपूर्ण आहे. युद्ध घडत असताना द्रौपदी दूर विराटनगरीत होती. तेव्हा, 'द्रौपदीतल्पसंस्थः' – द्रौपदीच्या गादीवर बसलेला – हा शब्द अर्जुनाने सामान्य अर्थाने वापरलेला नाही, हे उघड आहे. बाकी काही पाहायचे नाही म्हटले तरी त्या शब्दात, 'क्षात्रतेजाच्या नावे शून्य असलेल्या ह्या वाचिवीराला केवळ आपल्यामुळे द्रौपदी लाभली' हा भाव, आणि 'युद्धात मार खाऊन येऊन गादीवर झोपून असलेला हा पेद्रू आपल्याला वर तोंड करून युद्धावरून बोलतो आहे' ह्यावरून आलेला संताप, ह्या दोन्ही गोष्टी असल्याचे उघड दिसते.

अर्जुन येथवर जे काही बोलला होता, तेच फार झाले होते. तथापि, अर्जुनाने तेवढ्यावर भागवून घेतलेले नाही. द्रौपदी व भीम ह्यांच्यासारखेच त्यानेही युधिष्ठिराचे द्यूत उकरून काढले असून त्याविषयीचे त्याचे शब्द अधिकच परखड आहेत. ते असे :

न चाभिनन्दामि तवाधिराज्यं
यतस्त्वमक्षेष्वहिताय सक्तः।
स्वयं कृत्वा पापमनार्यजुष्ट-
मेभिर्युद्धे तर्तुमिच्छस्यरींस्तु।।
अक्षेषु दोषा बहवो विधर्माः
श्रुतास्त्वया सहदेवोऽब्रवीद्यान्।
तान्नैषि संतर्तुमसाधुजुष्टा-
न्येन स्म सर्वे निरयं प्रपन्नाः।।
त्वं देविता त्वत्कृते राज्यनाश-
स्त्वत्संभवं व्यसनं नो नरेन्द्र।
मास्मान्क्रूरैर्वाक्प्रतोदैस्तुद त्वं
भूयो राजन्कोपयन्नल्पभाग्यान्।। ८.४९.८५-७

– तुझ्या हाती पुन्हा राज्य येणार आहे, ह्यात मला काही आनंद होत नाही. कारण, स्वतःचे अहित करून घेण्याइतका तू द्यूतावर आसक्त आहेस. अनार्यांना आवडणारी ती गोष्ट स्वतः केल्यावर आता युद्धात तू शत्रूंना आमच्या मदतीने हरवण्याची इच्छा करतो आहेस. द्यूतामध्ये अनेक दोष आणि पातके आहेत. ती सहदेवाने सांगितलेली तू ऐकली होतीस. तरीही, नीचांना आवडणारे ते (द्यूत) तुला सोडता आले नाही आणि म्हणूनच आपल्या सर्वांच्या वाट्याला (हा) नरक आला आहे. द्यूत खेळलास तू! तुझ्यामुळे आमचे राज्य गेले! राजा, तुझ्याचमुळे आमच्यावर हे अरिष्ट आले! राजा, दुर्दैवी (अल्पभाग्य) असलेल्या आम्हाला क्रूर शब्दांचे आसूड हाणून आता पुन्हा एकदा क्रुद्ध करू नकोस.

द्रौपदीच्या तोंडचा 'दुर्द्यूतदेविन्' हा शब्द आणि अर्जुनाने येथे वापरलेले 'त्वमक्षेष्वहिताय सक्तः' – स्वतःचे अहित करून घेण्याइतका तू द्यूतावर आसक्त आहेस - हे शब्द, ह्यांत कितीसा फरक आहे, हा प्रश्नच आहे. ते कसेही असो, त्या दोघांनाही युधिष्ठिर चुकून एकदा व निरुपाय म्हणून द्यूत खेळला असे दिसले नसून तो द्यूतावर नको तितका आसक्त असल्याचे दिसले आहे, हे त्यांच्या शब्दांवरून स्पष्ट आहे.

अर्जुन पांडवांना दुर्दैवी (अल्पभाग्य) का म्हणतो आहे, ते त्याच्या तोंडी नाही. तुझ्यासारखा मोठा भाऊ आमच्या नशिबी आला हे आमचे दुर्दैव, हा भाव त्यामागे

दिसतो. द्रौपदीच्या तोंडचे, 'अशोच्यं नु कुतस्तस्या यस्या भर्ता युधिष्ठिरः' – युधिष्ठिर जिचा पती आहे तिला 'अशोच्य' कोठून असायचे? – हे शब्द येथे आठवतात.

युधिष्ठिराचे हात जाळायला निघालेल्या भीमाला थोपवताना अर्जुनाने काढलेल्या उद्गारांहून, तसेच उद्योग-पर्वातील बैठकीत त्याने काढलेल्या उद्गारांहून हे सारे किती वेगळे आहे!

युधिष्ठिराला आपण बोललो त्यावरून अर्जुनाला लगेच पश्चात्ताप होतो व तो आत्महत्या करण्यासाठी तलवार उपसतो. कृष्ण त्याला, 'आत्महत्या करणे हे तर मोठ्या भावाचा वध करण्याहून अधिक पाप आहे', असे सांगून एक उपाय सुचवतो : तू स्वतःची थोडी प्रौढी मिरव की, तुला हवे ते झाल्यातच जमा आहे. कृष्णाचा भाव असा : जसा थोर माणसांचा अपमान करणे हे त्यांना मारण्यासारखेच असते, तसेच स्वतःची प्रौढी मिरवणे हे आत्महत्या करण्यासारखेच आहे. कृष्णाच्या म्हणण्यात कितपत तथ्य आहे, हा प्रश्न वेगळा आहे. अर्जुनाला कृष्णाची युक्ती अगदी पटली आहे. ... स्वतःला शिक्षा म्हणून आत्महत्याही झाली आणि वर जीवही वाचला. आणखी काय हवे? .... अर्जुन, 'माझ्या-सारखा धनुर्धर साऱ्या जगात कोणी नाही' इथून सुरुवात करून, युद्धात मी किती काय केले आहे ते युधिष्ठिराला सांगतो. त्यानंतर, 'आज एकतर कर्ण मरेल नाही तर मी मरेन', असे तो कबूल करतो. तसेच, 'मी तुला बोललो त्यावरून मला क्षमा कर', असे म्हणून तो युधिष्ठिराच्या पाया पडतो आणि युद्धाला जायला निघतो.

अर्जुनाचा पश्चात्ताप आणि त्याने मागितलेली क्षमा ह्या संबंधात प्रश्न असा पडतो की, ते दोन्ही नेमके कशासाठी होते? युधिष्ठिराला टाकून बोलण्यात आपण आपली पायरी ओलांडली असे अर्जुनाला वाटले म्हणून, की आपण युधिष्ठिरावर रागाच्या भरात केलेले आरोप बिनबुडाचे होते असे त्याला वाटले म्हणून? ह्या प्रश्नाला कथेत स्पष्ट शब्दांमध्ये उत्तर नाही. तथापि, अर्जुनाच्या त्या प्रसंगीच्या मनःस्थितीविषयी संहितेत दिलेल्या गोष्टीं-वरून असे दिसते की, आपण बिनबुडाचे आरोप केले असे अर्जुनाला वाटलेले नसून युधिष्ठिराला ते सारे बोलण्यात आपण आपली पायरी ओलांडली, असे त्याला वाटले आहे.

अर्जुनाने केलेल्या 'किंचितशा' अपमानावरची युधिष्ठिराची प्रतिक्रिया लेखात पुढे येते आहे.

* * *

आता कृष्ण.

कौरव-पांडवांमध्ये द्यूत घडले तेव्हा कृष्ण तेथे प्रत्यक्ष हजर नव्हता. तथापि, द्यूतात नेमके काय घडले ते त्याला इत्थंभूत माहीत होते, असे कथेवरून दिसते. द्यूतात पांडवांचे राज्य कौरवांनी लबाडीने जिंकले हे – पांडवपक्षातल्या इतर सर्वांसारखे – कृष्णालाही स्पष्ट असून त्याच्या तोंडी चारचौघांत तसे आलेही आहे.[३] पण, द्यूतासंबंधीच्या युधिष्ठिराच्या वागण्यात क्षात्रधर्म किंवा तसलेच काहीतरी उदात्त होते, असे त्याचे मत दिसत नाही.[४]

त्या संदर्भात, कृष्ण हास्तिनपुराला पांडवांच्या वतीने शिष्टाई करायला गेला होता तेव्हा कुरुसंसदेत घडलेला एक प्रसंग आठवतो. कृष्णाने तेथे सांगितलेल्या गोष्टींचा सारांश असा : कौरवांनी पांडवांचे राज्य त्यांना परत करावे हे बरे; न केल्यास युद्ध होईल, आणि युद्धात पांडवांपुढे कोणाचाही टिकाव लागणार नाही. त्यावर भीष्म, द्रोण व धृतराष्ट्र ह्यांनी कृष्णाची री ओढली होती; एवढेच नव्हे तर, त्या तिघांनी दुर्योधनाला फार गर्व न करण्याचा व पांडवांशी संधी करण्याचा सल्ला दिला होता. सर्वजण आपल्याला दोष देत आहेत हे पाहिल्यावर चिडून दुर्योधन कृष्णाला म्हणाला होता,

प्रियाभ्युपगते द्यूते पाण्डवा मधुसूदन।
जिताः शकुनिना राज्यं तत्र किं मम दुष्कृतम्।।
यत्पुनर्द्रविणं किंचित्तत्राजीयन्त पाण्डवाः।
तेभ्य एवाभ्यनुज्ञातं तत्तदा मधुसूदन।।
अपराधो न चास्माकं यत्ते ह्यक्षपराजिताः।
अजेया जयतां श्रेष्ठ पार्थाः प्रव्राजिता वनम्।।

५.१२५.७-९

– मधुसूदना, पांडव द्यूत खेळायला राजीखुषीने आले होते आणि त्यात शकुनीने त्यांचे राज्य जिंकले. त्यात मी काय दुष्कृत्य केले?[५] तसेच, मधुसूदना, त्या वेळी पांडवांकडून जे द्रव्य जिंकण्यात आले होते, ते त्यांना तेथल्या तेथे परत करण्यास मी संमती दिली

होती. विजयी वीरा, अजिंक्य पांडव द्यूतात पुन्हा हरून वनात गेले, ह्यात आमचा काही दोष नाही

दुर्योधन एवढ्यावर थांबलेला नाही. 'आम्ही पांडवांचा असा काय अपराध केला आहे की, त्यामुळे ते आम्हाला पांचालांच्या मदतीने मारू पाहत आहेत?' हा प्रश्नही साळसूदपणे विचारायला त्याने कमी केलेले नाही. कौरवांच्या बाजूचा हा – ज्याला आपण अधिकृत म्हणू शकू तो – बचाव आहे. धृतराष्ट्र, दुर्योधन व शकुनी ह्यांच्यामधली द्यूताविषयीची खासगीत झालेली खलबते वैशंपायनांच्या वर्णनावरून आपल्याला माहीत असतात. त्यामुळे, दुर्योधनाचे म्हणणे हा केवळ मानभावीपणा आहे – निदान, तो म्हणतो आहे त्यात तथ्य असले तरी, तो त्याला सोईस्कर आहेत तेवढ्याच गोष्टी सांगून गैरसोईच्या गोष्टींकडे कानाडोळा करतो आहे – हे आपल्याला दिसते. ती खलबतं माहीत नसली तर दुर्योधनाचे म्हणणे पुरावा देऊन खोडणे सोपे नाही. तथापि, कुरुसंसदेत बोळ्याने दूध पिणारे कोणीच नसल्याने, दुर्योधनाने साळसूदपणाचा कितीही आव आणला, तरी त्याने कोणी भुललेले नाही. दुर्योधनाच्या म्हणण्याला कृष्णाने त्या प्रसंगी भडकून दिलेले उत्तर हे पांडवपक्षाने दुर्योधनावर केलेले – ज्याला आपण अधिकृत म्हणू शकू असे – जणू आरोपपत्रकच आहे. दुर्योधनाने पांडवांविरुद्ध केलेल्या अपकृत्यांचा कृष्णाने पाढा वाचला असून त्या पाढ्यात भीमाला पाजलेले विष, लाक्षागृहदाह, द्रौपदीची विटंबना, द्यूतातली फसवणूक हे सारे आहे. त्या आरोपपत्रकातल्या साऱ्याच गोष्टी खऱ्या आहेत, हे कथेवरून आपल्याला दिसते. दुर्योधन सद्‌गुणांचा पुतळा नाही, हे निर्विवाद. पण दुर्योधनाच्या अपकृत्यांचा पाढा वाचताना कृष्णाने गैरसोईची म्हणून कानाडोळा केलेली गोष्ट म्हणजे – युधिष्ठिर ज्या प्रकारे द्यूताला गेला, आणि तेथे गेल्यावर तो ते ज्या प्रकारे खेळला त्याविषयीची दुर्योधनाची विधाने. युधिष्ठिराच्या वागण्याचे क्षात्रधर्म किंवा तसलेच दुसरे कोठले उदात्त समर्थन करण्याच्या प्रयत्नही कृष्णाने केलेला नाही. दुर्योधनाने द्यूत रचल्यावरून त्याला दोष देऊन दोन शिव्या घालण्यावर कृष्णाने वेळ मारून नेली आहे.

तथापि, दुर्योधनाला दोषी धरणे ही झाली एक बाजू. युधिष्ठिर आणि त्याचे द्यूत ह्याविषयी कृष्णाला दुसरी बाजूही दिसली असल्याचे व्यासांनी शल्यपर्वातल्या एका नाट्यपूर्ण प्रसंगात गुंफले आहे. आपल्या सर्वांना परिचित असलेला तो प्रसंग आहे, दुर्योधनवध. युद्धाच्या अठराव्या दिवशीची गोष्ट आहे. त्या दिवशी दुपार उलटण्याच्या सुमारास कौरवसेनेचा संपूर्ण विनाश होतो; आणि युद्धात आपला पराजय झाल्याचे पाहून धीर खचलेला दुर्योधन रणातून पळून जाऊन रणभूमीजवळच्या एका तळ्यात लपून बसतो. पांडवांनी बराच वेळ शोधाशोध केल्यावर शेवटी त्यांना दुर्योधन कोठे लपला आहे ते कळते. 'हरामखोर सापडला!' ह्या आनंदात, त्या वेळी शिल्लक असलेली सारी पांडवसेना दुर्योधन लपला होता त्या तळ्याकाठी येऊन थडकते. पण तेथे आल्यावर त्यांना असे दिसते की, दुर्योधनाने त्या तळ्याचे पाणी मायेने गोठवले असून त्यात तो पहुडला आहे; आणि जोवर तो स्वतः होऊन त्या तळ्यातून बाहेर येत नाही, तोवर त्याला काही करणे कोणाही माणसाला शक्य नाही. मग, रणातून पळून जाण्यावरून दुर्योधनाची खिल्ली उडवून युधिष्ठिर त्याला डिवचून डिवचून युद्धाचे आह्वान द्यायला सुरुवात करतो. दुर्योधन ते सारे दातओठ खात बराच वेळ निमूटपणे ऐकून घेतो. पण शेवटी मानी दुर्योधनाला युधिष्ठिराचे शब्द असह्य होतात आणि तो पांडवांशी युद्धाला उभे राहण्याविषयी तळ्यातून बोलू लागतो. त्यानंतर त्या दोघांमध्ये असे ठरते की, दुर्योधनाने तळ्यातून बाहेर येऊन युद्धाला उभे राहायचे, पण दुर्योधनावर पांडवपक्षातल्या सर्वांनी एकदम हल्ला करायचा नाही; त्याच्याशी सर्वांनी लढायचे, पण एका वेळी एकाने अशा प्रकारे. पांडवपक्षाच्या दृष्टीने पाहता येथवर सारे काही ठीक चालले होते. तथापि त्यानंतर, पांडवांनी गेले अठरा दिवस भगीरथ प्रयत्न करून मिळवलेल्या जयावर पाणी पडण्याची वेळ येते : दुर्योधनाने न मागितलेल्या दोन गोष्टी युधिष्ठिर – कोठलेही कारण नसताना – स्वतः होऊन कबूल करतो. आपण त्या गोष्टी का कबूल करत आहोत, ह्याचे स्पष्टीकरण युधिष्ठिराच्या तोंडी नाही. तथापि, त्यामागे दैव, क्षात्रधर्म, आह्वान, व्रत किंवा तसलेच दुसरे कोठले कारण असल्याचे संहितेवरून दिसत नाही.

युधिष्ठिराने कबूल केलेली पहिली गोष्ट अशी :

दुर्योधन निवडेल त्या शस्त्राने सारेजण त्याच्याशी द्वंद्वयुद्धे करतील. युधिष्ठिराचे म्हणणे ऐकून दुर्योधन तळ्यातून बाहेर येतो आणि द्वंद्वयुद्धांसाठी गदा हे शस्त्र निवडतो. ह्या संबंधात प्रस्तुत असलेली गोष्ट अशी की, जसा शकुनीचा 'द्यूतात पारंगत' असा जगभर लौकिक होता, तसा दुर्योधनाचा 'गदायुद्धात पारंगत' असा जगभर लौकिक होता.

आपण कबूल केलेली पहिली गोष्ट पुरेशी झाली नाही असे वाटून की काय, त्यानंतर थोड्या वेळाने युधिष्ठिराने दुर्योधनाला स्वतः होऊन कबूल केलेली दुसरी गोष्ट अशी : दुर्योधन निवडेल तो पांडव त्याच्याशी गदा-युद्ध करेल; आणि त्या एका गदायुद्धात दुर्योधन जर जिंकला, तर सारे युद्ध संपून कुरुराज्य दुर्योधनाचे!

अवदसा आठवणे म्हणतात ते हे! कारण, गदायुद्धात भीमाव्यतिरिक्त कोठल्याही पांडवाला दुर्योधन हां हां म्हणता झोपवेल, हे उघड होते. तसेच, दुर्योधन व भीम ह्या दोघांनाही बलरामाकडून गदायुद्धाचे जरी सारखेच शिक्षण मिळाले होते आणि भीमाच्या अंगात जरी बळ जास्त होते तरी, दुर्योधन अधिक कसलेला होता. तसेच, भीमाला मारण्याच्या इच्छेने दुर्योधनाने गेली तेरा वर्षे लोखंडी पुतळ्यावर गदायुद्धाचा सराव केला होता. ह्या साऱ्यामुळे, भीम जर धर्माला धरून गदायुद्ध खेळला, तर तोदेखील दुर्योधनापुढे टिकेल की नाही, हा संशयच होता. कृष्णाने हे सारे चिंतेच्या सुरात व स्पष्ट शब्दांत त्या प्रसंगी बोलून दाखवल्याचे संहितेत आहे.

दुर्योधनाच्या मते, त्याच्यापुढे गदायुद्धात भीमासकट सारे पांडव किस झाडकी पत्ती होते. म्हणून, तो त्याचा प्रतिद्वंद्वी पांडवांनाच निवडायला सांगतो. मग पांडव भीमाला निवडतात आणि दुर्योधन व भीम ह्यांचे गदायुद्ध सुरू होते. सलामीच्या झटापटी लवकरच संपून ते गदायुद्ध जेव्हा रंगात येते, तेव्हा कृष्णाला वाटलेली चिंता, किंबहुना धास्ती, रास्त होती हे उघड होते. त्या द्वंद्वात भीम जिंकत असता तर, 'भीमाने दुर्योधनाच्या मांड्या फोडाव्या' ही धर्मबाह्य सूचना करण्याचे कृष्णाला काहीच कारण नव्हते. कृष्णाने ती सूचना, भीम धर्माला धरून आणखी काही वेळ खेळल्यास तो दुर्योधनाच्या हातून मारला जाणार आहे हे त्याला उघड झाल्यावर केली आहे.[६]

युधिष्ठिराच्या प्रस्तुत प्रसंगीच्या अविचारी वागण्या-बोलण्यात कृष्णाला काय दिसले आहे? द्यूत! ... ज्यामुळे पांडवांच्या अब्रूची लक्तरे झाली; त्यांचे राज्य गेले; त्यांना मनातल्या मनात चरफडत, दात-ओठ खात, व खंत करत बारा वर्षे मोठ्या हालअपेष्टांमध्ये वनात काढावी लागली आणि तेरावे वर्ष दुसऱ्याच्या घरी नोकर म्हणून लपून काढावे लागले त्या पूर्वीच्या विषम द्यूतासारखेच एक नवे विषम द्यूत! आधीच्या द्यूतासारखे हे नवे द्यूतही युधिष्ठिर आणि दुर्योधन ह्यांच्यातच घडत होते. पणाला लावलेली गोष्टही सामान्यतः तीच होती – राज्य. फरक एवढाच होता की, हे द्यूत अक्षांनी खेळण्याऐवजी शस्त्रांनी खेळायचे होते; आणि, पूर्वीच्या द्यूतात दुर्योधनाच्या वतीने खेळलेला शकुनी प्रतिपक्षाला भारी होता, तर आताच्या द्यूतात युधिष्ठिराच्या वतीने खेळणारा भीम प्रतिपक्षाच्या तोडीचा नव्हता.

हे सारे पाहिल्यावर, युधिष्ठिरावर कधी नाही ते संतापून कृष्ण त्याला म्हणाला आहे,

तदिदं द्यूतमारब्धं पुनरेव यथा पुरा।
विषमं शकुनेश्चैव तव चैव विशां पते।।

९.३२.७

– राजा, पूर्वीसारखेच तू हे पुन्हा एकदा विषम द्यूत आरंभलेस – शकुनीच्या व तुझ्यामधल्या (द्यूता)-सारखे!

[महाभारताच्या महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या (नीलकंठी) पाठात येथे (संशोधित आवृत्तीत नसलेला) एक अधिक श्लोक आहे. त्यात कृष्णाचा उद्वेग फार सुंदर भाषेत व्यक्त केला आहे असे वाटल्याने तो येथे उद्धृत करत आहोत.

युधिष्ठिरावर मनापासून वैतागलेला कृष्ण शेवटी स्वतःशीच बोलण्याच्या थाटात म्हणतो :

नूनं न राज्यभागेषा पाण्डोः कुन्त्याश्च संततिः।
अत्यन्तवनवासाय सृष्टा भैक्ष्याय वा पुनः।।

२०२*

– खरोखर, पांडू व कुंती ह्यांची ही संतती राज्य मिळण्यासाठी (जन्माला आली) नसून अनंतकाळ वन-वासासाठी, नाहीतर भीक मागण्यासाठीच जन्माला आली आहे.[७]]

युधिष्ठिर प्रस्तुत प्रसंगी – प्रतिस्पर्ध्याच्या नैपुण्याची दखल न घेता वाहवून गेला, त्याने नको त्या गोष्टी एका गदायुद्धाच्या निष्पत्तीवर – काही कारण नसताना – पणाला लावल्यासारखे केले, आणि आता जर का त्या एका गदायुद्धात दुर्योधन जिंकला तर युद्धात जय मिळवून हाती आलेले राज्य पुन्हा घालवायला युधिष्ठिर स्वतः सर्वस्वी जबाबदार असेल, हे सारे उघड आहे. त्या प्रसंगी पुढे अर्जुनाशी बोलताना तर युधिष्ठिराच्या त्या वागण्याला कृष्णाने स्पष्टपणे मूर्खपणा (अबुद्धि) म्हटले आहे. तथापि, कृष्णाच्या तोंडचे वर उद्धृत केलेले 'पुनरेव यथा पुरा' – पूर्वीसारखेच पुन्हा एकदा – हे शब्द वेगळ्या कारणाने महत्त्वाचे आहेत : कृष्णाला सद्यःप्रसंग आणि पूर्वीचे द्यूत ह्यांमध्ये युधिष्ठिरावर मनस्वी वैतागण्याइतके साम्य दिसले आहे.

द्रौपदी, भीम आणि अर्जुन ह्यांच्याहून कृष्णाचे युधिष्ठिराशी नाते दूरचे आहे. तसेच, त्या तिघांना लागली आहे तशी युधिष्ठिराच्या कृत्यांची झळ कृष्णाला लागलेली नाही. साहजिकच, युधिष्ठिर आणि त्याचे द्यूत ह्यांविषयीचे कृष्णाचे शब्द त्या तिघांइतके स्पष्ट व तिखट नाहीत. पण, कृष्णाचा मथितार्थ वेगळा नाही.

*    *    *

युधिष्ठिर व त्याचे द्यूत ह्यासंबंधीची द्रौपदी, भीम, अर्जुन व कृष्ण ह्या चौघांची मते पाहून झाली. त्या चार भिन्न प्रकृतींच्या व्यक्ती आहेत. त्यांतल्या प्रत्येक व्यक्तीने द्यूताकडे तिच्या स्वतःच्या व्यक्तिमत्वास व परिस्थितीस अनुरूप अशा रीतीने पाहिल्याचे व्यासांनी किती नाट्यपूर्ण प्रकारे कथेत गुंफले आहे!

आता, त्या चौघांच्या मतांविषयी दोन टिपणे.

चारचौघांत बोलताना अर्जुन व कृष्ण ह्यांनी जरी युधिष्ठिर द्यूतात हरल्याचे खापर कौरवांच्या माथी फोडले असले, तरी आपले ते मत सदोष असल्याची त्यांना जाण दिसते. द्रौपदी व भीम ह्यांनी तर चारचौघांतही युधिष्ठिर व त्याचे द्यूत ह्या संबंधात कटू उद्गार काढले आहेत.

द्रौपदी, भीम, अर्जुन व कृष्ण त्या चौघांनी युधिष्ठिराविषयी कटू उद्गार काढलेले जे प्रसंग लेखात मांडून झाले आहेत, त्या प्रसंगींच्या त्या चौघांच्याही बोलण्यात महत्त्वाचे साम्य आहे : त्यांना कौरव कधीच निर्दोषी दिसले नसले तरी, आपापसात बोलताना त्या प्रसंगीं त्यांनी युधिष्ठिरालाही – किंबहुना, मुख्यतः युधिष्ठिरालाच – दोषी धरले आहे. तसेच, युधिष्ठिराला दोषी धरताना, द्यूताच्या प्रसंगी युधिष्ठिराच्या तोंडी असलेल्या दैव, पित्याची आज्ञा, व्रत आणि स्वधर्म ह्या गोष्टींपैकी एकाही गोष्टीचा त्या कोणाच्या तोंडी उल्लेख नाही; एवढेच नव्हे तर, (कोठल्या तरी कारणाने) निरुपाय झाला म्हणून किंवा (कोठल्या तरी अर्थाने) धर्माचरण करायचे म्हणून युधिष्ठिर द्यूत व अनुद्यूत खेळला, असे त्यांना वाटल्याचे दर्शवणारेही काही त्या कोणाच्या तोंडी नाही. फार मोठा मनःक्षोभ झाल्यावरच त्या चौघांच्या तोंडून युधिष्ठिराला दोष देणारे शब्द निघाले आहेत, हे खरे आहे. द्रौपदी व अर्जुन ह्यांनी – तसेच, द्यूताच्या प्रसंगी भीमाने – तर त्यानंतर सारवासारवही केली आहे. तथापि, त्या सर्वांच्या मनात असलेले युधिष्ठिराचे मानाचे स्थान पाहता ती सारवासारव मनुष्यस्वभावाला धरूनच नाही का? मनःक्षोभामुळे त्या चौघांपैकी एखादी व्यक्ती एखाद्या प्रसंगी भान न राहून काहीही बरळली, असे एकवेळ म्हणता येईल. जेव्हा मनःक्षोभ झाल्यावर त्या चौघांनाही अगदी भिन्न स्वरूपांच्या प्रसंगी एकच गोष्ट दिसल्याचे कथेत आहे, तेव्हा ते अभावितपणे घडलेले नाही हे उघड आहे.

ह्या साऱ्या प्रसंगांतून व मतांतून आपण काय घ्यायचे ते व्यासांनी – त्यांच्या पद्धतीनुसार – आपल्यावर सोडले आहे. त्याविषयी आमचे विचार लेखाच्या शेवटल्या भागात मांडले आहेत.

*    *    *

पांडवपक्षातल्या मुख्य कथापात्रांपैकी उरला युधिष्ठिर. आपण द्यूतात हरलो ह्याचा ठपका चारचौघांत बोलताना त्यानेही कौरवांवर ठेवला आहे. काही उदाहरणे देणे योग्य ठरेल.

द्रौपदी, भीम आणि युधिष्ठिर ह्यांच्यामधला आरण्यकपर्वातला – लेखात आधी विवेचिलेला – विवाद घडून काही दिवस होऊन गेले होते. एक दिवस भीम युधिष्ठिराला, 'तुझ्या द्यूतरूपी दोषाने आपण सर्वजण संकटात पडलो आहोत' असे म्हणून, कौरवांशी लगेच युद्धाला उभे राहण्याविषयी त्याचे मन वळवण्याचा पुन्हा एकदा प्रयत्न







अनुक्रमणिका

करतो. युधिष्ठिर बधत नाही खरा; पण तो भीमाची जेमतेम समजूत घालत असताना बृहदश्व ऋषी आपल्याकडे येत असल्याचे त्यांना दिसते. बृहदश्वांचा यथायोग्य आदर-सत्कार करून झाल्यावर युधिष्ठिर त्यांना करुणपणे म्हणतो,

अक्षद्यूतेन भगवन्धनं राज्यं च मे हृतम्।
आहूय निकृतिप्रज्ञैः कितवैरक्षकोविदैः।।
अनक्षज्ञस्य हि सतो निकृत्या पापनिश्चयैः।
भार्या च मे सभां नीता प्राणेभ्योऽपि गरीयसी।।

३.४९.३२-३

– भगवन्, द्यूतात निष्णात आणि निकृतीत (फसवा-फसवीत) तज्ज्ञ असलेल्या जुगाऱ्यांनी मला द्यूताचे आह्वान देऊन माझे धन आणि राज्य हरण केले. द्यूत खेळणे (नीट) माहीत नसलेल्या मला प्राणांहूनही अधिक प्रिय असलेली माझी पत्नी त्या पापी लोकांनी भर सभेत नेली.

अशा पडक्या मनःस्थितीत युधिष्ठिराने जेव्हा, माझ्याहून अधिक दुर्दैवी व दुःखी कधी कोणी झाला नसेल असे उद्गार काढले, तेव्हा बृहदश्वांनी त्याला नलोपाख्यान सांगितले आहे.

दुसरा तसाच एक प्रसंग पाहूया. लेखात आधी येऊन गेले आहे की, युद्धाच्या अठराव्या दिवशी दुर्योधन रणातून पळून जाऊन रणभूमीजवळच्या एका तळ्यात लपून बसला होता आणि त्याला बाहेर काढण्यासाठी युधिष्ठिराने त्याची खिल्ली उडवून त्याला युद्धाचे आह्वान दिले होते. त्या भाषणाच्या शेवटी युधिष्ठिर दुर्योधनाला म्हणतो की, 'अरे दुर्बुद्धे, तुला जगू द्यायचे की नाही ते आज माझ्या हाती आहे. मला हवे असले तर मी तुला जगू देऊ शकतो; पण, तू जगू देण्याच्या लायकीचा नाहीस.' आपले ते मत विशद करण्यासाठी म्हणून की काय, दुर्योधनाने पांडवांवर केलेल्या अपकारांचा पाढा युधिष्ठिराने त्याला वाचून दाखवला आहे. पाण्यात ढकलणे, विष पाजणे, सर्प डसवणे, जाळायचे प्रयत्न करणे हे सारे सांगून झाल्यावर युधिष्ठिर म्हणतो,

त्वया विनिकृता राजन्राज्यस्य हरणेन च।
अप्रियाणां च वचनैर्द्रौपद्याः कर्षणेन च।।
एतस्मात्कारणात्पाप जीवितं ते न विद्यते।
उत्तिष्ठोतिष्ठ युध्यस्व तत्ते श्रेयो भविष्यति।।

९.३०.६६-७

– राजा, तू आमचे राज्य हरण करून, आम्हाला कटू बोलून, आणि द्रौपदीची विटंबना करून आम्हाला अपाय केलेस. अरे पाप्या, ह्या कारणास्तव तुझा आता जीव जाणार आहे. ऊठ, ऊठ! युद्ध कर! त्यातच तुझे भले आहे.

'पाप' – पाप्या – हे संबोधन अपशब्दात्मक आहे.

तथापि, ही सारी झाली एक बाजू. खासगीत बोलताना युधिष्ठिराच्या तोंडी – द्रौपदी, भीम, अर्जुन व कृष्ण ह्यांच्यासारखेच – वेगळ्या प्रकारचे शब्द आहेत. एवढेच नव्हे, तर युधिष्ठिर हे महाभारतातले मुख्य कथापात्र आहे हे लक्षात घेऊन की काय, तो कौरवांशी द्यूत व अनुद्यूत खेळायला का गेला आणि त्या प्रसंगी तो बेफामपणे का खेळला, ह्या महत्त्वाच्या प्रश्नांची उत्तरे व्यासांनी कथेत त्याच्या स्वतःच्या तोंडी गुंफली आहेत. युधिष्ठिराची ती उत्तरे लक्षात घेतली की, त्याने द्यूताला व अनुद्यूताला जाताना दिलेली कारणे, तसेच त्याचे द्यूतातले व अनुद्यूतातले बेफाम खेळणे, हे सारे वेगळ्या प्रकाशात दिसू लागते.

द्यूत व अनुद्यूत ह्यांविषयीच्या वरील प्रश्नांची युधिष्ठिराच्या तोंडची उत्तरे असलेले चार प्रसंग व्यासांनी कथेत घातले आहेत. विशेष म्हणजे, ते प्रसंग त्यांनी अशा काही प्रकारे रचले आहेत की, नाट्याबरोबरच, आपल्याला युधिष्ठिराच्या मनात डोकावून पाहता यावे एवढ्यासाठीच त्यांनी ते घातले आहेत, असे वाटावे. संहितेत ते प्रसंग ज्या क्रमाने आले आहेत, त्या क्रमाने आपण त्यांच्याकडे पाहूया.

त्यांपैकी पहिला प्रसंग, पांडव वनात गेल्यावर थोड्याच दिवसांत घडला आहे. पांडवांना परत बोलावून घेऊन त्यांना त्यांचे राज्य परत कर, असा सल्ला विदुर धृतराष्ट्राला देतो; तो न पटून धृतराष्ट्र त्याला, 'हवे तिकडे चालता हो' असे सांगतो; आणि ते ऐकून विदुर पांडवांकडे जातो. हे सारे घडते त्या वेळी पांडव काम्यक-वनात असतात. विदुर आपल्याकडे येत असल्याचे दुरून दिसल्यावर, मागच्या वेळी तो द्यूताचे आमंत्रण/आह्वान घेऊन आला होता हे युधिष्ठिराला आठवलेले दिसते. तो








भीमाला म्हणतो,

कच्चिन्नायं वचनात्सौबलस्य।
समाह्वाता देवनायोपयाति।
कच्चित्क्षुद्रः शकुनिर्नायुधानि
जेष्यत्यस्मान्पुनरेवाक्षवत्याम्।।
समाहूतः केनचिदाद्रवेति
नाहं शक्तो भीमसेनापयातुम्।
गाण्डीवे वा संशयिते कथं चि -
द्राज्यप्राप्तिः संशयिता भवेन्नः।। ३.६.८-९

– हा (विदुर) मला शकुनीच्या सांगण्यावरून द्यूताचे आमंत्रण/आह्वान द्यायला तर आलेला नाही ना? आणि, त्या नीच शकुनीला पुन्हा द्यूतात आमची आयुधे तर जिंकायची नाहीत ना? भीमसेना, कोणी 'ये!' असे आमंत्रण/आह्वान दिल्यास मला माघार घेता येत नाही. पण गाण्डीव धनुष्य पणास लावून ते गेल्यास आपल्याला राज्य परत मिळवता येईल की नाही, ही शंकाच आहे.

एवढे सारे धिंडवडे व धुळदाण होऊन गेल्यावरही द्यूताला आमंत्रण/आह्वान आले तर ते नाकारण्याची भाषा युधिष्ठिराच्या तोंडी नाही. फरक एवढाच झालेला दिसतो की, आपण द्यूत खेळायला का जाणार, आहोत त्याविषयी युधिष्ठिराच्या तोंडी आता वेगळे शब्द आहेत.

युधिष्ठिराचे वरील उद्‌गार संदिग्ध वाटू शकतात : त्याने द्यूताच्या वेळी दिलेल्या व्रत वगैरे कारणांचा त्यात उल्लेख नसला तरी, त्याला तेच म्हणायचे होते असे मानता येते. तथापि, व्यासांनी कथेत घातलेल्या पुढच्या प्रसंगात संदिग्ध काही नाही. तो प्रसंग आहे – द्रौपदी, भीम व युधिष्ठिर ह्यांच्यामध्ये आरण्यकपर्वात झालेल्या व लेखात आधी उल्लेखिलेल्या विवादाचा उत्तरार्ध (३.२८-३७).

युधिष्ठिराने राज्य घालवल्यावरून भीमाने त्या विवादात त्याला दोष दिल्याचे लेखात येऊन गेले आहे. भीमाचे कटू शब्द ऐकून युधिष्ठिराला अतिशय वाईट वाटले. तेवढ्या कारणाने, युधिष्ठिर अनुद्यूतात दिलेला त्याचा स्वतःचा शब्द मोडायला तयार झाला अशातले नाही. तरी पण, द्रौपदीने आणि भीमाने अशी झोड उठवल्यावर युधिष्ठिराने भीमाला दिलेले उत्तर, व्यासांनी आपल्यासमोर उभ्या केलेल्या युधिष्ठिराचे यथायोग्य आकलन होण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. युधिष्ठिराच्या मनात कोठेतरी खोल दडून बसलेले विचार त्याच्या तोंडून त्या उत्तरात बाहेर पडलेले दिसतात.[८] युधिष्ठिर भीमाला म्हणतो,

असंशयं भारत सत्यमेत-
द्यन्मा तुदन्वाक्यशल्यैः क्षिणोषि।
न त्वा विगर्हे प्रतिकूलमेत -
न्ममानयाद्धि व्यसनं व आगात्।। ३.३५.१

– भारता, तू मला वाक्शल्यांनी टोचून घायाळ करतो आहेस खरा; पण (तू म्हणतो आहेस) ते सारे निःसंशय खरे आहे. मी तुला दोष देत नाही. माझ्या चुकीच्या वागण्यानेच तुमच्यावर हे संकट आले आहे.

'माझे चुकले' हे शब्द आपल्यालाच अडतात असे नाही. ते शब्द युधिष्ठिराच्या तोंडून कथेत येथे प्रथमच, आणि द्रौपदीने आणि भीमाने एवढी मोठी झोड उठवल्यावर आले आहेत. युधिष्ठिर पुढे म्हणतो,

अहं ह्यक्षानन्वपद्यं जिहीर्ष-
न्राज्यं सराष्ट्रं धृतराष्ट्रस्य पुत्रात्।

– मीच दुर्योधनाचे राष्ट्र आणि राज्यपद हिरावून घेण्याच्या इच्छेने द्यूत खेळायला गेलो.[९]

युधिष्ठिराला सत्प्रवृत्तींचा पुतळा मानण्याची पद्धत दिसते. त्याच्या तोंडचे हे शब्द स्तंभित करणारे आहेत. जसे युधिष्ठिराचे राज्य जिंकून घेण्याच्या इच्छेने दुर्योधनाने त्याला द्यूत खेळायला बोलावले होते, तसे दुर्योधनाचे राज्य जिंकून घेण्याच्या इच्छेने युधिष्ठिर ते खेळायला गेला होता? दैव, पित्याची आज्ञा, व्रत आणि स्वधर्म ह्यांचे काय झाले?

द्यूताला जाण्यामागे युधिष्ठिराचा जो अंतस्थ हेतू होता, त्याप्रमाणे गोष्टी घडल्या नाहीत, हे कथेत येथवर येऊन गेले आहे. ते तसे कसे झाले, त्याचे युधिष्ठिर आता स्पष्टीकरण देतो. तो सांगतो :

तन्मा शठः कितवः प्रत्यदेवी-
त्सुयोधनार्थं सुबलस्य पुत्रः।। ३.३५.२

– त्या वेळी माझ्याशी (दुर्योधनाने खेळण्याऐवजी) दुर्योधनाच्या वतीने तो धूर्त जुगारी शकुनी खेळू लागला.

आपण दुर्योधनाशी खेळू व त्याला हरवू, ह्या अपेक्षेने युधिष्ठिर द्यूताला गेला होता असे दिसते. ते कसेही

असो; युधिष्ठिराला शकुनीशी खेळायची वेळ का आली त्याचे युधिष्ठिराच्या तोंडचे स्पष्टीकरण येथे संपले. दुर्योधनासाठी शकुनीने खेळणे 'विषम' असल्याचे युधिष्ठिराला तेव्हाच दिसले होते. तशा द्यूताला आपण 'नाही!' म्हणू शकलो असतो, ह्याची दखल युधिष्ठिराच्या तोंडी येथेही नाही.

द्यूतात युधिष्ठिर पुढचेमागचे पाहून खेळण्याऐवजी बेफामपणे खेळला म्हणूनच तो त्याच्या जवळचे सारे काही हरला आणि त्यामुळेच पुढच्या साऱ्या गोष्टी घडू शकल्या, हे लेखाच्या पूर्वार्धात येऊन गेले आहे. आता, 'तो तसे का खेळला?' ह्या महत्त्वाच्या प्रश्नाचे त्याच्या स्वतःच्या तोंडचे उत्तर :

महामायः शकुनिः पार्वतीयः
सदा सभायां प्रवपन्नक्षपूगान्।
अमायिनं मायया प्रत्यदेवी –
त्ततोऽपश्यं वृजिनं भीमसेन।। ३.३५.३

– पर्वतप्रदेशातला शकुनी मोठा मायेने खेळणारा असून द्यूतसभेत तो खूप अक्षांनी खेळला. भीमसेना, माया न येणाऱ्या माझ्याशी तो मायेने खेळला, तेव्हा मला (त्याच्या खेळण्यातली) कुटिलता दिसली.

'माया' हा शब्द वाचल्यावर असे वाटण्याची शक्यता आहे की, "तरीच युधिष्ठिर द्यूतात हरला! शकुनीने द्यूत खेळताना लबाडी केली ह्याचा, त्या सत्यवक्त्याच्या तोंडच्या ह्या शब्दांहून आणखी पुरावा तो काय हवा?" तथापि, द्यूत हा खेळ गणनाकौशल्यावर बसवलेला होता, हे लेखाच्या पूर्वार्धात येऊन गेले आहे. तसेच, गणना-कौशल्यात पारंगतता प्राप्त करून देणाऱ्या अक्षहृदय नावाच्या एका विद्येचा महाभारतात उल्लेख आहे. समज असा की, ती विद्या येत असणाऱ्याला, एखाद्या झाडाला किती पाने आहेत तेसुद्धा एका दृष्टिक्षेपात अचूकपणे मोजता येत असे. (अधिक स्पष्टीकरणासाठी लेखाच्या पूर्वार्धाला जोडलेले (पहिले) परिशिष्ट पाहा). शकुनीला ती विद्या अवगत होती, असे संहितेत स्पष्टपणे कोठे आलेले नाही. तथापि, त्याला ती विद्या अवगत असावी, असे त्याच्या लौकिकावरून दिसते. तसे असेल तर, ती विद्या द्यूताच्या वेळी अवगत नसलेल्या युधिष्ठिराला शकुनी माया वापरून खेळला असे वाटले असल्यास नवल नाही. युधिष्ठिराला कथेत पुढे (नलोपाख्यान सांगून झाल्यावर), 'आपल्याला पुन्हा कोणी द्यूताचे आह्वान देऊन हरवेल अशी तुला वाटणारी भीती मी घालवतो', असे म्हणून बृहदश्व ऋषींनी त्याला अक्षहृदय विद्या शिकवली आहे.

ते कसेही असो; शकुनी मायेने खेळतो हे युधिष्ठिराला, खरेतर, द्यूताला जाण्यापूर्वीच माहीत होते. द्यूताचे आमंत्रण घेऊन आलेल्या विदुराशी बोलताना युधिष्ठिर तसे म्हणालाही होता, हे लेखाच्या पूर्वार्धात येऊन गेले आहे. तेव्हा युधिष्ठिर आता, शकुनीच्या खेळण्यातल्या मायेने त्याला धक्का बसल्याचा सूर का काढतो आहे, हा प्रश्नच आहे.

आता, शकुनी मायेने खेळतो आहे हे दिसूनही युधिष्ठिर शकुनीशी बेफामपणे का खेळला, हा महत्त्वाचा प्रश्न. त्याचे युधिष्ठिराच्या तोंडचे उत्तर असे :

अक्षान्हि दृष्ट्वा शकुनेर्यथाव–
त्कामानुलोमानयुजो युजश्च।
शक्यं नियन्तुमभविष्यदात्मा
मन्युस्तु हन्ति पुरुषस्य धैर्यम्।।
यन्तुं नात्मा शक्यते पौरुषेण
मानेन वीर्येण च तात नद्धः।
न ते वाचं भीमसेनाभ्यसूये
मन्ये तथा तद्भवितव्यमासीत्।। ३.३५.४-५

– अक्ष शकुनीच्या इच्छेप्रमाणे सम वा विषम पडत आहेत, हे पाहून मला स्वतःवर ताबा ठेवता आला असता. पण क्रोध माणसाचा धीर नष्ट करत असतो. बाबा रे! पौरुष, मान आणि शौर्य ह्यांनी जखडलेल्या माणसाला स्वतःला आवरता येणे शक्य नसते. भीमसेना, मी तुझ्या शब्दांचा राग मानत नाही. पण, माझ्या मते, ते सारे भवितव्यच होते.

युधिष्ठिराचे वरील शब्द, त्याला द्यूताचा कैफ चढून तो हिरिरीने खेळला हे दर्शवणारे आहेत.

दैवाविषयी युधिष्ठिराला काय माहीत होते आणि काय माहीत नव्हते, ते लेखाच्या पूर्वार्धात येऊन गेले आहे. युधिष्ठिराच्या तोंडी येथे असलेला भवितव्याचा – म्हणजेच, दैवाचा – उल्लेख त्याच्या तोंडी दैवासंबंधी असलेल्या आधीच्या उद्गारांहून वेगळ्या प्रकारचा आहे.

अनुक्रमणिका






द्यूतात घडलेल्या गोष्टींमागचा दैवाचा हात युधिष्ठिराला आता दिसत असला, तरी जे घडले त्यात आपलाही हात होता – किंबहुना, जे घडले त्यात आपला मोठा हात होता आणि आपण वाहवून जाऊन केलेले कृत्य आपल्या सर्वांच्या आयुष्यांची वाताहत होण्याला कारणीभूत आहे – हेदेखील त्याला आता स्पष्टपणे दिसते आहे.

कौरव व पांडव आपापसात लढून नष्ट होतील, ही दैवी स्तरावरची गोष्ट युधिष्ठिराला माहीत असूनही त्याने कथेत पुढे घडलेल्या युद्धातल्या मनुष्यहानीला त्यानंतर दुर्योधनाला जबाबदार धरले आहे, ह्याची येथे आठवण होते.[१०]

युधिष्ठिराच्या मनात आपल्याला डोकावून पाहता येते, असा कथेतला तिसरा प्रसंग आरण्यकपर्वात बऱ्याच पुढे आहे. अस्त्रे संपादन करण्यासाठी इंद्रलोकी गेलेला अर्जुन परत यावयाची वेळ झाली होती आणि तीर्थयात्रा करत असलेले चार पांडव व द्रौपदी त्याला भेटायला गंधमादन पर्वताकडे निघाले होते. मोठमोठाले डोंगर पायी ओलांडण्याच्या श्रम सहन न होऊन द्रौपदी वाटेत एक दिवस बेशुद्ध पडते. ती खाली पडल्याचे नकुलाला दिसल्यावर तो युधिष्ठिर, भीम व सहदेव ह्यांना हाका मारतो. बेशुद्ध असलेल्या द्रौपदीला त्या प्रसंगी मांडीवर घेऊन युधिष्ठिराने केलेला शोक, द्यूताविषयी त्याच्या मनात घोळणाऱ्या विचारांवर प्रकाश पाडणारा आहे. द्रौपदीला वनात यावे लागले त्याबद्दल त्याने त्या प्रसंगी काढलेले उद्गार आहेत :

किमिदं द्यूतकामेन मया कृतमबुद्धिना।
आदाय कृष्णां चरता वने मृगगणायुते ।। ३.१४४.१२

- द्यूत खेळण्याच्या इच्छेपायी मी मूर्ख हे काय करून बसलो! (त्यामुळेच) पशूंच्या थव्यांनी भरलेल्या वनात द्रौपदीला बरोबर घेऊन मी आता हिंडतो आहे.

'हिला पांडव पती म्हणून मिळाले की ही सुखात राहील, असे वाटून तिला द्रुपदाने आम्हाला दिली होती', असे म्हणून तो पुढे म्हणतो,

तत्सर्वमनवाप्यैव श्रमशोकाद्धि कर्शिता।
शेते निपतिता भूमौ पापस्य मम कर्मभिः।।

- ते सर्व न मिळता, मज पाप्याच्या कृत्यांमुळे ही परिश्रम आणि शोक ह्यांनी पीडित होऊन आज जमिनीवर पडली आहे!

द्यूतात घडलेल्या गोष्टींच्या उत्तरदायित्वाविषयी युधिष्ठिराने त्याच्या स्वतःच्या मनाशी येथवर केलेले लपंडाव आता संपलेले दिसतात. आपण महामूर्खपणा केला आणि त्याच्या दारुण परिणामांना आपण जबाबदार आहोत, हे माणसाला दिसायचे म्हणजे आणखी कसे?

द्यूतात घडलेल्या घटनांविषयी युधिष्ठिराच्या मनातल्या गोष्टी दाखवणारा कथेतला चौथा प्रसंग आहे– लेखात आधी येऊन गेलेली कर्णपर्वातली शब्दाशब्दी. त्या प्रसंगी अर्जुनाने युधिष्ठिराची गर्हणा केली होती खरी; पण आपण आपली पायरी ओलांडल्याचे वाटून अर्जुनाला लगेच पश्चात्ताप झाला होता, आणि युधिष्ठिराची क्षमा मागून तो कर्णवधासाठी रणभूमीवर जायला निघाला होता. त्या प्रसंगाचे येथवरचे वर्णन लेखात आधी येऊन गेले आहे.

आता, त्या साऱ्यावरची युधिष्ठिराची प्रतिक्रिया. अर्जुन आपली क्षमा मागून कर्णवधासाठी रणभूमीवर परततो आहे, हे युधिष्ठिराला जाणवले तरी आहे की नाही कोण जाणे! त्याच्या मनात घोळते आहे – अर्जुनाने केलेली गर्हणा! जन्मात कधी कोणी केली नव्हती अशी गर्हणा! आपण दुसऱ्यांना किती नालायक दिसतो आहोत, हे ऐकणे कोणाला आवडत असते? अपमान, वेदना, दुःख ह्या साऱ्याने युधिष्ठिराचे अंतःकरण भरून येते. तो अर्जुनाला म्हणतो :

कृतं मया पार्थ यथा न साधु
येन प्राप्तं व्यसनं वः सुघोरम्।
तस्माच्छिरश्छिन्द्धि ममेदमद्य
कुलान्तकस्याधमपूरूषस्य ।। ८.४९.१०२

– अर्जुना, मी अयोग्य कृत्य केले आणि त्यामुळेच तुमच्यावर हे घोर संकट आले आहे. मी अधम आहे; कुळाचा अंत करणारा आहे. म्हणून, तू आता माझा शिरच्छेद कर.

कधी नाही इतका मनःक्षोभ झालेला युधिष्ठिर त्याला पुढे म्हणतो,

पापस्य पापव्यसनान्वितस्य
विमूढबुद्धेरलसस्य भीरोः।
वृद्धावमन्तुः पुरुषस्य चैव
किं ते चिरं मामनुवृत्य रुक्षम्।।






गच्छाम्यहं वनमेवाद्य पापः
सुखं भवान्वर्ततां मद्विहीनः
योग्यो राजा भीमसेनो महात्मा
क्लीबस्य वा मम किं राज्यकृत्यम्।।

८.४९.१०३-४

– मी पापी आहे; मला वाईट व्यसने आहेत; मी मूर्ख, आळशी आणि भित्रा असून वृद्धांचा अवमान करणारा व कठोर आहे, माझ्यासारख्या क्रूर माणसाच्या आज्ञेत राहून तुला काय मिळणार आहे? नीच असलेला मी आजच वनात निघून जातो. तू माझ्यामागे सुखात राहा. तो महात्मा भीमच राजा व्हायला योग्य आहे. माझ्यासारख्या षंढाला राज्याची उठाठेव कशाला हवी?

ह्यानंतर 'तू संतापून काढलेले हे असे कठोर शब्द मला आणखी सहन करवणार नाहीत', असे अर्जुनाला म्हणून युधिष्ठिर गादीवरून उठतो व वनात जायला निघतो. मग, अर्जुनाने गाण्डीव धनुष्याबद्दल केलेल्या प्रतिज्ञेची कृष्ण युधिष्ठिराला आठवण करून देतो; मोठ्यांचा अपमान हे मरणच मानले जाते आणि म्हणून मीच अर्जुनाला तुझा अपमान करायला सांगितला होता, हे सारे सांगतो; आणि त्याची क्षमा मागतो. लेखात आधी दिल्याप्रमाणे, आपण युधिष्ठिराला बोललो ह्याने लज्जित झालेला अर्जुनही मग युधिष्ठिरच्या पायावर मस्तक ठेवून व 'मी केवळ (प्रतिज्ञा पाळण्याच्या) धर्माचारणासाठी तुला बोललो', असे सांगून त्याची क्षमा मागतो. त्यावर युधिष्ठिरही अर्जुनाला आलिंगन देऊन त्याला क्षमा केल्याचे सांगतो; आणि कृष्ण व अर्जुन कर्णवधासाठी रणभूमीकडे निघतात.[११]

द्यूतातल्या युधिष्ठिराच्या उत्तरदायित्वाविषयी त्याच्या तोंडी चारचौघांत आणि खासगीत असलेले उद्गार पाहून झाले. त्या उद्गारांवरून असे दिसते की, द्यूतात जे घडले त्याविषयी चारचौघांत बोलताना युधिष्ठिराने – पांडवपक्षातल्या इतर सर्वांसारखे –कौरवांना जबाबदार धरले आहे. तसेच, खासगीत बोलतानाही तो, 'माझे चुकले' हे सहजासहजी कबूल करायला गेलेला नाही. द्रौपदी गंधमादन पर्वतावर खाली पडते त्या प्रसंगी, आणि अर्जुन त्याचा शिरच्छेद करायला निघतो त्या प्रसंगी तर मोठा मनःक्षोभ झाल्यावर त्याच्या तोंडून त्या अर्थाचे शब्द बाहेर पडले आहेत. युधिष्ठिराने द्यूतावरून स्वतःला दोष लावून घेतल्याचे जे चार – अगदी वेगळ्या स्वरूपांचे – प्रसंग व्यासांनी कथेत घातले आहेत, त्यांपैकी कोठल्याही एकाबद्दल असे म्हणता येणे एक वेळ शक्य आहे की, युधिष्ठिराला खरे तसे म्हणायचे नसून त्याचे ते शब्द त्रागा दर्शवणारे आहेत; पण त्या चारही प्रसंगी कथेत त्याच्या तोंडी एकच गोष्ट आहे, हे उघडच अभावितपणे झालेले नाही.

ह्या साऱ्यातून आपण काय घ्यायचे ते व्यासांनी – त्यांच्या पद्धतीनुसार – आपल्यावर सोडले आहे. त्याविषयी काही विचार लेखात पुढे येतच आहेत.

* * *

'द्यूताच्या प्रसंगी घडलेल्या दोषास्पद गोष्टींच्या उत्तर-दायित्वात युधिष्ठिराचा काही वाटा आहे का?' हा प्रश्न लेखाच्या पूर्वार्धात सुरवातीला उभा केला होता. त्या प्रश्नाला संलग्न असलेले महाभारतातले सारे प्रसंग येथवर पाहून झाले आहेत. आता, त्या साऱ्यातून आपण काय घ्यायचे त्याकडे वळूया.

प्रथम थोडा आढावा.

लेखाच्या पूर्वार्धात म्हटल्याप्रमाणे, द्यूतातील युधिष्ठिराच्या सहभागाविषयीचे मुख्य प्रश्न असे : युधिष्ठिराने द्यूताचे आमंत्रण का स्वीकारले? तो द्यूतात बेफामपणे का खेळला? आणि तो अनुद्यूत खेळायला का गेला? त्या प्रश्नांना व्यासांनी कथेत खुद्द युधिष्ठिराच्या तोंडी घातलेली उत्तरे दोन गटांत विभागता येतात. पहिला गट आहे – त्याच्या तोंडी द्यूताच्या प्रसंगी असलेली, पित्याची आज्ञा, व्रत, आह्वान व स्वधर्म ही कारणे. संदर्भ देणे सोईस्कर व्हावे एवढ्यासाठी ह्या कारणांना आपण 'युधिष्ठिराचे समर्थन' म्हणूया. दुसरा गट आहे - त्याच्या तोंडी आरण्यकपर्वापासून पुढे वेळोवेळी आलेले, 'माझेच चुकले' ह्या अर्थाचे शब्द. ह्या दुसऱ्या गटाला आपण 'युधिष्ठिराचा कबुलीजबाब' म्हणूया. युधिष्ठिराच्या समर्थनावरून असे म्हणता येते की : त्याला खरेतर द्यूतही खेळायचे नव्हते आणि अनुद्यूतही खेळायचे नव्हते; त्या दोन्ही प्रसंगी तो केवळ निरुपाय म्हणून खेळला होता. अतएव, इच्छा असल्यास मग असे मानता येते की, त्या प्रसंगी जे घडले त्याचे उत्तरदायित्व सर्वस्वी

कौरवांकडे होते. युधिष्ठिराच्या समर्थनात, 'तो द्यूतात बेफामपणे का खेळला?', ह्या महत्त्वाच्या प्रश्नाला उत्तर नाही. युधिष्ठिराचा कबुलीजबाब कथेत त्याच्या समर्थनानंतर आला आहे. त्या कबुलीजबाबावरून असे म्हणणे अपरिहार्य होते की : द्यूत आणि अनुद्यूत ह्या प्रसंगी जे घडले, त्याचे उत्तरदायित्व सर्वस्वी कौरवांकडे नव्हते; जे घडले त्यातल्या दोषाचा काही वाटा - खरेतर, मोठा वाटा - युधिष्ठिराकडे होता. युधिष्ठिराच्या समर्थनातल्या कोठल्याच मुद्द्याचा त्याच्या कबुलीजबाबात उल्लेख नाही.

वर दिलेल्या आढाव्यावरून हे उघड आहे की, द्यूतातील युधिष्ठिराच्या उत्तरदायित्वाचा विचार करताना उपस्थित होणारे काही महत्त्वाचे प्रश्न असे : युधिष्ठिराच्या समर्थनाचा व त्याच्या तोंडच्या कबुलीजबाबाचा परस्परांशी मेळ घालता येतो का? असल्यास तो कसा? नसल्यास तो का नाही? आणि, मेळ घालता येत नसेल, तर त्यांतली कोठली गोष्ट आपण ग्राह्य धरायची? आणि ती का? तसेच, द्यूतात घडलेल्या गोष्टींमागे दैवाचाही काही-तरी हात होता, हे लेखात येऊन गेले आहे. तर मग, त्या संबंधात आपण युधिष्ठिराला कितीसे जबाबदार धरायचे?

द्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागावरून द्रौपदी, भीम, अर्जुन आणि कृष्ण ह्या चौघांनीही-निदान काही प्रसंगी तरी - त्याच्यावर ठपका ठेवला असल्याचे लेखात येऊन गेले आहे. तेव्हा, हे उघड आहे की, युधिष्ठिराच्या उत्तरदायित्वाचा विचार करताना युधिष्ठिराचे समर्थन आणि त्याचा कबुलीजबाब एवढ्यांचाच विचार करून पुरणार नाही. द्रौपदी, भीम, अर्जुन आणि कृष्ण ह्या पांडवपक्षातल्या महत्त्वाच्या कथापात्रांनी त्याच्यावर ठेवलेल्या ठपक्याकडेही लक्ष पुरवणे आवश्यक आहे. त्या संबंधात लक्षात घ्यायचा एक प्रश्न असा : युधिष्ठिरावर ठपका ठेवताना त्या कोणाच्याही तोंडी दैवाचा किंवा युधिष्ठिराच्या समर्थनातल्या दुसऱ्या गोष्टींचा उल्लेख नाही, हे कसे?

लेखात विशद केलेल्या विविध प्रसंगांतून, आणि त्या प्रसंगांद्वारे व्यासांनी कथेत गुंफलेल्या वेगळ्या पदरातून आपण काय घ्यायचे, ह्या प्रश्नाकडे थोड्या वेगळ्या दृष्टीने पाहूया. आपण काय घ्यावे ते व्यास आपल्याला स्पष्ट शब्दांमध्ये सांगायला येत नसतात. त्या बाबतीत त्यांची पद्धत अशी : त्यांना मांडायच्या असलेल्या गोष्टी-विषयी ते कथेत कोठेतरी अर्थगर्भ उद्‌गार किंवा प्रसंग घालतात; आणि त्या उद्‌गारांचा किंवा प्रसंगांचा संबंध आणि अर्थ लावण्याचे काम, तसेच त्या अनुषंगाने निर्माण होणाऱ्या विविध प्रश्नांना उत्तरे शोधण्याचे काम आपल्यावर सोपवतात. लेखात येऊन गेलेल्या प्रसंगांशी संलग्न असलेली काही उदाहरणे देणे योग्य ठरेल. युधिष्ठिराला द्यूताचे व्यसन होते, असे व्यासांनी - त्यांचे स्वतःचे मत म्हणून - कथेत कोठे घातलेले नाही. तर मग, त्याला ते व्यसन होते की नाही? युधिष्ठिर व द्यूत ह्याविषयी द्रौपदीचे खरे मत, 'आमचा बाब्या भोळा आहे; त्याला त्या हलकट ठकांनी फसवून लुबाडले!' हे होते, की 'त्या जुगारड्याला जुगाराची धुंदी चढली, आणि त्यात त्याचे भान सुटले म्हणून तो तसे खेळला', हे होते? की दोन्ही? तिने युधिष्ठिराला 'दुर्द्यूतदेविन्' म्हटले ते केवळ मनःक्षोभामुळे होते, की मनःक्षोभाच्या त्या क्षणात तिच्या तोंडून - ती एरवी स्वतःजवळही कबूल करणार नाही असे - कटुसत्य बाहेर पडले होते? अर्जुन युधिष्ठिराला घालूनपाडून बोलला ते केवळ प्रतिज्ञापालन करण्यासाठी युधिष्ठिराचा किंचितसा अपमान करायचा म्हणून होते, की अर्जुनाच्या मनाच्या चोरकप्प्यात युधिष्ठिराविषयी दडून बसलेल्या कटू गोष्टी संधी मिळाल्यावर उफाळून बाहेर आल्या होत्या? अर्जुनाने युधिष्ठिराला 'त्वमक्षेष्वहिताय सक्तः' - स्वतःचे अहित करून घेण्याइतका तू द्यूतावर आसक्त आहेस - म्हटले होते. अर्जुनाच्या मते, युधिष्ठिराला द्यूताचे व्यसन होते का? युधिष्ठिराच्या समर्थनातली एकही गोष्ट द्रौपदी, भीम, अर्जुन आणि कृष्ण ह्यांच्यातल्या कोणाच्याच तोंडी खासगीतल्या प्रसंगी नाही; ह्याचे कारण, त्यांना ते समर्थन खरे वाटलेले नाही हे आहे का? युधिष्ठिराच्या समर्थना-तल्या एकाही गोष्टीचा - विशेषतः, स्वधर्माचा व त्याच्या व्रताचा[१६] - आरण्यकपर्वातल्या विवादात त्याच्या स्वतःच्या तोंडी उल्लेख नाही, हे कसे? त्यावरून, आपल्याला द्यूत खेळायला खरेतर जायचेच होते, आणि आपण स्वतःला वेगळी कारणे देऊन फसवत होतो हे त्याला नंतर उमगले, असे म्हणता येते का? द्यूतातल्या घटनांविषयी युधिष्ठिराने मनात कोणाला दोषी धरले आहे? स्वतःला की कौरवांना? की दोघांनाही?







आता, वर उभ्या केलेल्या विविध प्रश्नांना आमची उत्तरे.

लेखात मांडलेल्या विविध प्रसंगांवरून आम्ही काढलेला मुख्य निष्कर्ष असा : द्यूताच्या प्रसंगी घडलेल्या दोषास्पद गोष्टींच्या उत्तरदायित्वात कौरवांचा मोठा वाटा असला, तरी त्यात युधिष्ठिराचा तेवढाच मोठा वाटा असल्याचे व्यासांना अध्याहृत आहे. युधिष्ठिराचा कबुलीजबाब ग्राह्य आहे असे संहिता सांगत असल्याचे आम्हाला दिसते. तो द्यूतात बेफामपणे खेळला – विशेषतः, त्याने द्रौपदीला पणाला लावले – ह्याचे आम्हाला दिसणारे कारण असे : त्याला द्यूताचा कैफ चढून तो हिरिरीने खेळला व त्यात त्याचे तारतम्य सुटले. द्रौपदी, भीम व अर्जुन ह्यांनी युधिष्ठिरावर ठेवलेल्या ठपक्यात, तसेच युधिष्ठिराच्या कबुलीजबाबात ते अध्याहृत असल्याचे आम्हाला दिसते. युधिष्ठिराच्या समर्थनाविषयी आम्हाला संहिता असे सांगताना दिसते की, ते देताना आपण अजाणतेपणे आत्मप्रतारणा करत होतो – निदान, आपण त्या वेळी स्वतःला दिलेली कारणे चुकीची नसलो, तरी ती मुख्य कारणे नव्हती – आणि आपण द्यूत खेळलो ह्याचे खरे व मुख्य कारण आपल्याला द्यूत खेळायची इच्छा होती, हे सारे त्याला स्वतःला कथेत पुढे उमगले आहे. द्यूतात घडलेल्या गोष्टी दैवाशी सुसंगत असल्या, तरी त्या घडून येण्यात आपला मोठा हात होता आणि म्हणून त्या गोष्टींचे उत्तरदायित्व आपल्याकडे आहे, हे कथेत पुढे युधिष्ठिराला स्पष्ट झाल्याचे लेखात येऊन गेले आहे. युधिष्ठिराला द्यूताचे व्यसन होते असे द्रौपदी व अर्जुन म्हणत असल्याचे आम्हाला दिसते. द्यूतातील युधिष्ठिराच्या सहभागाविषयी द्रौपदी, भीम, अर्जुन व कृष्ण ह्यांनी खासगीत काढलेले कटू उद्‌गार आम्हाला अर्थपूर्ण वाटतात. कोठल्या तरी कारणाने (उदाहरणार्थ, व्यासांनी केवळ कथा नाट्यपूर्ण करण्यासाठी त्या गोष्टी संहितेत घातल्या आहेत असे मानून), द्यूतात घडलेल्या गोष्टींमधले युधिष्ठिराचे उत्तरदायित्व ठरवताना त्यांचे ते उद्‌गार मनावर घेण्याचे कारण नाही, हा विचार आम्हाला संहितेशी विसंगत वाटतो. युधिष्ठिरावर ठपका ठेवताना त्या चौघांच्याही तोंडी दैवाचा किंवा युधिष्ठिराच्या समर्थनातल्या दुसऱ्या गोष्टींचा उल्लेख नाही, ह्याचे आम्हाला दिसणारे कारण असे : त्यांच्या मते, युधिष्ठिराचो ती कारणे वरवरची असून तो द्यूत का खेळला ते, त्याचे खरे कारण त्यांना ठाऊक आहे.

आमचे निष्कर्ष पटोत वा न पटोत; द्यूताविषयी निदान एक गोष्ट येथवर उघड व्हावी : द्यूतात घडलेल्या घटनांच्या संबंधात पांडवपक्षाने कौरवांना कितीका दोष दिला असेना, त्या संबंधात युधिष्ठिर सर्वस्वी निर्दोषी होता, असे पांडवपक्षाला स्वतःलाच वाटलेले नाही.

## परिशिष्ट २

द्यूतात घडलेल्या गोष्टींच्या संबंधातले युधिष्ठिराचे उत्तरदायित्व हा महाभारताच्या अभ्यासातला एक महत्त्वाचा मुद्दा आहे. तेव्हा, महाभारताच्या अनेक प्रख्यात तज्ज्ञांनी त्यावर आपापली मते व्यक्त केली असून त्या मतांमध्ये एकवाक्यता नाही, ह्यात नवल वाटण्यासारखे काही नाही. तज्ज्ञांच्या त्या मतांचा वाचकाला परिचय करून देणे, हा प्रस्तुत परिशिष्टाचा उद्देश आहे. अधिक माहितीसाठी येथे दिलेले संदर्भ पाहा.

इंगल्स् ह्यांच्या मते द्यूताच्या प्रसंगी युधिष्ठिर अत्यंत कठिण परिस्थितीतही धर्मास धरून वागला असून पांडवपक्षातल्या प्रमुख कथापात्रांनी केलेल्या युधिष्ठिराच्या निर्भर्त्सनेत खास काही तथ्य नाही.[१३] त्यांनी युधिष्ठिराच्या कबुलीजबाबाचा उल्लेख केलेला नाही.

ब्रॉकिंग्टन ह्यांनाही द्यूतानंतरचे युधिष्ठिराचे वागणे गौरवास्पद दिसले आहे.[१४] त्यांच्या मते, भीम वगैरे कथापात्रे दुय्यम प्रतीची असून आपापसातल्या संवादातील त्यांच्या भाषणांचे कथेतले एकमेव प्रयोजन युधिष्ठिराला त्याची मते सांगता यावी हे आहे; अतएव, त्या कथापात्रांच्या तोंडी युधिष्ठिराविरुद्ध असलेल्या गोष्टींना महत्त्व द्यायचे नसते.

मेहेंदळयांनी द्यूतातल्या विविध प्रसंगांवर लेखन केले आहे. द्यूतातल्या आणि अनुद्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागाविषयीचे युधिष्ठिराचे समर्थन त्यांना ग्राह्य वाटल्याचे दिसते. युधिष्ठिराने द्यूतात ज्या प्रकारे पण लावले त्याविषयी ते म्हणतात, "खेळ जिंकण्याचा जसा एक कैफ असतो, तसा तो हरण्याचाही असतो. शकुनीच्या वारंवार डिवचून बोलण्यामुळे युधिष्ठिराला असा कैफ चढला होता आणि तो बेभान झाल्यासारखा खेळत सुटला होता."[१५] त्यांच्या

अनुक्रमणिका

मते, शकुनीने द्यूत खेळताना लबाडी करून पांडवांना हरवले असा सर्वत्र रूढ असलेला समज चुकीचा असून, द्यूत खेळण्यातल्या त्याच्या कौशल्याच्या बळावर शकुनी जिंकला होता.[१६] द्यूताचा प्रसंग संपला कसा, ह्याविषयी त्यांचे मत असे : दुर्योधनाच्या प्रश्नाला अर्जुनाने दिलेल्या उत्तराचा अर्थ, 'युधिष्ठिराने द्रौपदीला पणाला लावले त्या वेळी तो तिचा ईश नव्हता' हा आहे; आणि त्याच्या त्या उत्तरामुळे द्रौपदीची दास्यातून सुटका झाली आहे.[१७] त्या वेळी कथेत घडलेले अपशकुन त्यांना प्रक्षिप्त वाटतात. मेहेंदळयांच्या मते, युधिष्ठिराचे आरण्यकपर्वातले 'माझेच चुकले' हे भाषण (३.३५.१-५), सभापर्वात दिलेल्या द्यूताच्या वर्णनाशी आणि, मुख्यतः, 'सत्प्रवृत्तींचा पुतळा' ह्या युधिष्ठिराच्या चित्रणाशी इतके विसंगत आहे की, तो प्रसंग एका वेगळ्याच कथेतला भाग आहे, असे मानावे लागते.[१८]

युधिष्ठिराच्या तोंडच्या समर्थनात काहीतरी गडबड आहे, हे राजगोपालाचारींनी महाभारतावर लिहिलेल्या त्यांच्या सुप्रसिद्ध पुस्तकातही आहे. राजगोपालाचारींच्या मते, युधिष्ठिराने द्यूताचे आमंत्रण स्वीकारण्यामागे त्याच्या समर्थनात असलेल्या कारणांबरोबरच त्याचे द्यूताचे व्यसनही आहे.[१९] युधिष्ठिराने द्यूतात लावलेल्या वेगवेगळ्या पणांविषयी त्यांनी वापरलेल्या शब्दांवरून असे दिसते की, त्यांच्याही मते युधिष्ठिराला द्यूताचा कैफ चढला होता. राजगोपालचारींच्या पुस्तकात युधिष्ठिराच्या कबुलीजबाबाचा उल्लेख नाही.

कृष्णचैतन्य ह्यांनी महाभारताचे वाङ्मयीन दृष्टिकोणातून परीक्षण केले असून त्यांच्या पुस्तकातला द्यूतावरचा भाग वाचनीय आहे.[२०] त्यांच्या मते, युधिष्ठिराचा कबुलीजबाब ग्राह्य असून, त्याच्या तोंडी असलेले समर्थन ही त्याने स्वतःची अजाणतेपणे केलेली फसवणूक आहे. युधिष्ठिराने द्यूतात लावलेल्या वेगवेगळ्या पणांमागे त्यांनाही द्यूताचा कैफ दिसला आहे.[२१] युधिष्ठिर अनुद्यूत खेळायला का गेला, हा प्रश्न कृष्णचैतन्यांनी हाताळलेला नाही.

लिप्नर ह्यांच्या पुस्तकात द्यूताच्या प्रसंगाचे विवेचन आहे.[२२] त्यांच्या मते, युधिष्ठिराचे समर्थन ही त्याने द्यूत खेळण्यास होकार देण्यासाठी शोधलेली सोईस्कर सबब आहे. त्यांनी दिलेल्या वर्णनावरून असे दिसते की, युधिष्ठिराने द्यूतात लावलेल्या पणांमागे त्यांनाही द्यूताचा कैफ दिसला आहे. युधिष्ठिर अनुद्यूत खेळायला का गेला हा प्रश्न, लिप्नर ह्यांनी हाताळलेला नाही. तसेच, युधिष्ठिराच्या कबुलीजबाबाचा त्यांनी उल्लेख केलेला नाही.

द्रौपदी, भीम, अर्जुन व कृष्ण ह्यांनी द्यूतातील व अनुद्यूतातील युधिष्ठिराच्या सहभागाविषयी खासगीत काढलेल्या कटू उद्गारांचा उल्लेख मेहेंदळे, राजगोपालाचारी, कृष्णचैतन्य व लिप्नर ह्यांच्यापैकी कोणी केलेला नाही.

हिल ह्यांच्या पुस्तकात दैव व मानवी प्रयत्न (महाभारताच्या भाषेत, पुरुषकार) ह्यांच्यामधला संघर्ष हा महत्त्वाचा विषय महाभारतात कसा हाताळला आहे, त्याविषयी विवेचन आहे.[२३] त्यांनी द्यूतातील व अनुद्यूतातील युधिष्ठिराच्या सहभागाचे दैव हे स्पष्टीकरण कितपत ग्राह्य आहे, ह्यासंबंधी त्यांनी चर्चा केली आहे. त्या चर्चेत युधिष्ठिराचे समर्थन, त्याचा कबुलीजबाब, आणि द्रौपदी व भीम ह्यांनी युधिष्ठिरावर ठेवलेला ठपका ह्या साऱ्या गोष्टींचा उल्लेख आहे. युधिष्ठिराने द्यूतात लावलेल्या पणांमागे, युधिष्ठिराचा स्वतःवरचा ताबा सुटला हे कारण त्यांना दिसले आहे. त्यांनी काढलेला निष्कर्ष असा : घडले त्यात दैवाबरोबरच युधिष्ठिराचा स्वतःचाही हात होता.

कौरव-पांडवांमधल्या द्यूताच्या संदर्भात फान बायटनन् ह्यांनी मांडलेला – आणि, महाभारताच्या पाश्चात्त्य अभ्यासकांमध्ये बरीच मान्यता मिळालेला – अंदाज असा: वैदिक काळी राजसूयानंतर द्यूत खेळले जात असे; आणि महाभारतातले द्यूत त्या वैदिक काळाच्या प्रथेवर बसवलेले आहे.[२४]

द्यूतातल्या आणि अनुद्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागाविषयीचे आमचे मत लेखाच्या शेवटी येऊन गेले असून, ते मत कृष्णचैतन्य, लिप्नर, आणि हिल ह्यांच्या वर दिलेल्या मतांना बरेचसे धरून आहे.

## संदर्भसूची

Apte, V. S., (1890; Fourth Revised and Enlarged Edition, 1998). *The Practical Sanskrit-English Dictionary*; Motilal

अनुक्रमणिका





Banarsidass, Delhi.

Brockington, Mary, (2009). "*Husband or King? Yudhisthira's dilemma in the Mahbharata*, Indo-Iranian Journal, 44; 253-63 (2009). "*Husband or Slave? Interpreting the Hero of the Mahābhārata*", pp. 23-31 in, Goldman, R. P., and Tokunaga, M., (ed.), "Epic Undertakings"; Motilal Banarsidass, Delhi.

van Buitenen, J. A. B., tr. and ed., (1975). *The Mahābhārata*, vol. 2; The Univ. of Chicago Press, Chicago and London.

Chaitanya, Krishna, (1985). *The Mahabharata : A Literary Study*; Clarion Books, New Delhi.

Ganguli, K. M., tr. (1990). *The Mahābhārata of Krishna-Dwaipayana Vyasa; Translated into English Prose from the Original Sanskrit Text*, 12 vols., fifth edition; Munshiram Manoharlal, New Delhi.

Hill, Peter, (2001). *Fate, Predestination and Human Action in the Mahābhārata : A Study in the History of Ideas*; Munshiram Manoharlal, New Delhi.

Hiltebeitel, Alf, (2001). *Rethinking the Mahābhārata : A Reader's Guide to the Education of the Dharma King*; The Univ. of Chicago Press, Chicago and London.

Ingalls, Daniel H. H., (1997). "*On the Mahābhārata*", pp. 1-8 in Narang, S. P., (ed.), Modern evaluation of the Mahabharata felicitation volume of Prof. R. K. Sharma, Nag Publishers, Delhi.

Lipner, Julius (1994; paperback 1998). *Hindus : Their Religious Beliefs and Practice*; Routledge, London and New York.

Mehendale, M. A., (2001). *Madhu-Vidyā. Prof. Madhukar Anant Mehendale Collected Papers*; Laddu, S. D. et al., ed., L. D. Series : 125; L. D. Institute of Indology, Ahmedabad.

Monier-Williams, M., (1899; Reprint 1997). *A Sanskrit-English Dictionary*; Motilal Banarsidass, Delhi.

Rajagopalachari, C., (1951; 43rd Ed. 2001). *Mahābhārata*; Bharatiya Vidya Bhavan, Bombay.

Söhnen-Thieme, Renate, (1999). "*On the composition of the Dyūtaparvam in the Mahābhārata*", pp. 139-54 in, Brockington, Mary, and Schreiner, Peter, (ed.), Composing a Tradition : Concepts, Techniques and Relationships; Munshiram Manoharlal, New Delhi.

Sukthankar, V. S. et al., gen. ed., (1933-66). *The Mahābhārata for the First Time Critically Edited*, 19 vols.; Bhandarkar Oriental Research Institute, Pune.

कर्वे, इरावती, (१९७६). *युगान्त*, चौथी आवृत्ती, देशमुख आणि कंपनी, पुणे.

केळकर, भालबा, (संपा.) (१९८६). *संपूर्ण महाभारत: सुरस मराठी भाषांतर*, १० खंड; तिसरी आवृत्ती, वरदा बुक्स, पुणे.

जातेगांवकर, अ. वि., आणि जातेगांवकर, वा. अ., (२००९). *महाभारतातील काही प्रसंग : विवेचन*

*आणि रसग्रहण*, खंड १, ग्रंथाली, मुंबई.

मेहेंदळे, म. अ., (१९९०). *प्राचीन भारतीय द्यूत*; संत्रिका संशोधनमाला ३; ज्ञान प्रबोधिनी प्रकाशन, पुणे.

मेहेंदळे, म. अ., (२००१). *प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती*; प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई.

वाळिंबे, रा. शं., (प्रमुख संपा.), (१९८२-६). *महाभारत: मराठी अनुवाद*; ११ खंड; विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे.

* * *

## टिपणे

१. आरण्यकपर्वात पुढेही भीमाच्या तोंडी, 'भवतो द्यूतदोषेण सर्वे वयमुपप्लुताः' – तुझ्या द्यूतरूपी दोषाने आपण सर्वजण संकटात पडलो आहोत – हे शब्द आहेत. पाहा : (३.४९.१२).

२. द्रोणवधातल्या अधर्मावरून त्या वधानंतर पांडवपक्षात मोठा वितंडवादत झाला होता. त्या वितंडवादाला सुरुवात अर्जुनाने केलेल्या दोषारोपांपासून झाली होती व अर्जुनाच्या त्या वेळच्या वागण्यावरून भीमाने त्याची निर्भर्त्सना केली होती. अर्जुनाच्या प्रस्तुत भाषणात त्या निर्भर्त्सनेचा संदर्भ आहे. त्या वितंडवादासाठी पाहा : अ. वि. जातेगांवकर आणि वा. अ. जातेगांवकर (२००९; पृ. १२७-४६).

३. पाहा : (३.३१.५-६), (९.६०.४४).

४. कृष्ण आरण्यकपर्वात पांडवांना प्रथम भेटला तेव्हा त्याने म्हटले आहे की, माझ्या कानी योग्य वेळेला आले असते तर मी द्यूत घडूच दिले नसते. पाहा : (३.१४). द्यूताकडे पाहण्याचा कृष्णाचा दृष्टिकोण युधिष्ठिराच्या दृष्टिकोणाहून उघडच वेगळा आहे.

५. बलरामाने उद्योगपर्वाच्या प्रारंभी अशाच प्रकारचे मत व्यक्त केले आहे (५.२.१-११). बलरामाने केलेल्या द्यूताच्या वर्णनात थोड्या विसंगती आहेत. पण बलरामाला त्याविषयी मिळालेली माहिती काहीशी सदोष होती असे म्हणता येते. वेगळ्या विचारासाठी पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ६०-७०).

भीष्मांनी द्रौपदीच्या प्रश्नाला दिलेले उत्तर लेखात आधी येऊन गेले आहे. युधिष्ठिर 'निसृष्टकाम' होता हा त्यांच्या उत्तरातला भाव, आणि दुर्योधनाच्या तोंडच्या वरील श्लोकांपैकी पहिल्या श्लोकातला भाव ह्यांत साम्य आहे.

६. दुर्योधनाची मांडी भीमाने अधर्माने फोडली होती आणि त्या अधर्मावर पांघरूण घालण्याच्या उद्देशाने महाभारताच्या संहितेत कोणीतरी दुर्योधनाची मांडी फोडण्याची प्रतिज्ञा मागाहून घातली आहे, ह्या प्रतिपादनासाठी पाहा : मेहेंदळे (२००१; पृ. २६६-८५).

७. पाहा : Sukthankar, (1933-66; vol. 11, p. 243).

८. युधिष्ठिराच्या येथील उत्तराकडे Hill (2001; p. 307-8) ह्यांनी वेगळ्या दृष्टिकोणातून पाहिले आहे. त्यांचे मत असे : मानवी आयुष्यात दैवापुढे पुरुषकाराला काही अर्थ आहे का, ह्याविषयी महाभारतात अनेक ठिकाणी उलटसुलट चर्चा आहे खरी; तथापि, युधिष्ठिर हे महत्त्वाचे कथापात्र असल्याने, द्यूताच्या संबंधातले त्याचे उत्तरदायित्व ह्या विषयावर नुसते दही खाऊ मही खाऊ करून चालणार नाही, हे रचनाकारांना कधीतरी जाणवले आहे; आणि त्या चर्चांच्या बाबतीत, मानवी जीवनात पुरुषकारालाही स्थान आहे, ह्या बाजूने निकाल देण्यासाठी त्यांनी प्रस्तुत प्रसंग घातला आहे.

९. वेगळ्या अर्थासाठी पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ७१-२), Mehendale (2001; p. 505); तसेच, लेखास जोडलेल्या दुसऱ्या परिशिष्टामधली मेहेंदळ्यांची मते. वरील श्लोकार्धाचा प्रस्तुत लेखात घेतलेला अर्थ Ganguli (1990; vol. 2, Vana Parva, p. 76), van Buitenen (1975; p. 290), केळकर (१९८६; खंड २, पृ. ७६), वाळिंबे (१९८२-६; खंड २, पृ. ३३२) ह्या भाषांतरांना धरून आहे.

१०. उदाहरणार्थ : (९.५९.१९-२२), (१८.१.६-१०, २०-१).

११. द्यूतात घडलेल्या गोष्टींमध्ये आपला स्वतःचा हात असल्याची युधिष्ठिराला जाणीव झाली होती, हे दाखवणारे पुसट उल्लेख कथेत इतरत्रही आहेत. पाहा : (३.१४२.१२), (३.२४५.३-४),

(६.४६.१२-३), (६.१०३.२१-२). त्यांतले पहिले दोन प्रसंग खासगीतले आणि नंतरचे दोन प्रसंग चारचौघांतले आहेत.

१२. युधिष्ठिराच्या व्रताचा महाभारताच्या संहितेत दोनदाच उल्लेख आला असून सभापर्वात आलेले ते दोन्ही उल्लेख लेखाच्या पूर्वार्धात येऊन गेले आहेत. युधिष्ठिराच्या समर्थनातला, त्याचे ते व्रत हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. तथापि, कथेत पुढे त्या व्रताची पुसटही दखल कोठल्याही कथापात्राच्या तोंडी नाही; एवढेच नव्हे तर, संहितेतले पुढचे अनेक प्रसंग त्या व्रताशी सुसंगत नाहीत, हे सारे लेखात येथवर उघड झाले आहे. आमच्या मते, युधिष्ठिराचे व्रत संहितेत मागाहून घालण्यात आले आहे. पांडवांना शक्यतो गोरे, आणि कौरवांना शक्यतो काळे करण्याच्या खटपटीत, द्यूतासंबंधीच्या सभापर्वातल्या भागावर जी विविध पुटे चढवण्यात आली आहेत, त्यातलाच तो एक भाग आहे. रचनाकारांना एखाद्या प्रसंगात काही अडले तर त्या प्रसंगाचा मोहरा फिरवण्याचा प्रयत्न म्हणून ते त्यात त्यांना हवी ती भर घालतात आणि कथेत पुढे त्या भरीशी विसंगत प्रसंग असल्यास त्यात योग्य बदल करण्याची तसदी ते घेतातच असे नाही. हा प्रकार महाभारताच्या अनेक ठळक प्रसंगांमध्ये पाहावयास मिळतो. प्रस्तुत प्रसंग त्यातलाच आहे. अशा दुसऱ्या प्रसंगासाठी पाहा : दुर्योधनाची मांडी फोडण्याच्या प्रतिज्ञेविषयीचा मेहेंदळे (२००१; पृ. २६६-८५) हा लेख.

१३. "It is only later, under the emotional distress of defeat and exile that Draupadi and Bhīma accuse Yudhisthira of weakness. Indeed, all the heroes of the Mahabharata are accused at one time or another in the poem of vices which they do not have. Karna reviles Arjuna, Śalya reviles Karna. Even Krsna is reviled by Śiśupāla. This is no more than the way of the world ... The truth, from the point of view of the author of the Sabhaparvan, is that Yudhisthira was strong at the dice game. He was upholding the *dharma* under circumstances that would have broken a lesser man." Ingalls (1997 : 4). तथापि, इंगल्स्नी दिलेल्या निर्भर्त्सनांच्या उदाहरणांमध्ये आणि पांडवपक्षातल्या प्रमुख कथापात्रांनी युधिष्ठिरावर ठेवलेल्या ठपक्यांमध्ये मोठा फरक आहे. एकतर, त्या साऱ्यांनी युधिष्ठिराची नुसती निर्भर्त्सना केली नसून द्यूतात राज्य घालवण्यावरून त्याला दोष लावला आहे. दुसरे म्हणजे, कोठल्याही एका कथापात्राने एखाद्या प्रसंगी केलेल्या निर्भर्त्सनेची इंगल्स् म्हणतात तशी बोळवण करणे एक वेळ शक्य आहे. जेव्हा वेगवेगळ्या प्रमुख कथापात्रांच्या तोंडी वेगवेगळ्या प्रसंगी तीच गोष्ट येते, तेव्हा त्याला वेगळा अर्थ नाही का? तिसरी गोष्ट म्हणजे, युधिष्ठिराच्या तोंडचा कबुलीजबाब; आपल्यावर निष्कारण दोषारोप केले जात आहेत हा भाव त्याच्या तोंडच्या शब्दांतून दिसत नाही.

१४. पाहा : Brockington (2001, 2009). ब्रॉकिंग्टन ह्यांनी द्यूतानंतरच्या युधिष्ठिराच्या वागण्याचा रजस्वला स्त्रियांचा विटाळ टाळण्याशी संबंध जोडला आहे.

१५. पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ५३).

१६. पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ४७). शकुनी त्याच्या कौशल्याच्या बळावर जिंकला असेल तर मग, 'कौरवांनी द्यूतात आम्हाला फसवले' हा पांडवांनी कथेत वेळोवेळी केलेला आरोप अकारण ठरतो.

१७. पाहा : मेहेंदळे (२००१; पृ. ६५-८३; विशेषतः, पृ. ७५-८०). मेहेंदळ्यांचे मत, (२.६३.२१) ह्या श्लोकातल्या 'जानीध्वम्' ह्या एका शब्दाच्या ते घेत असलेल्या अर्थावर आधारलेले असून तो अर्थ इतर सर्व भाषांतरकारांनी लावलेल्या अर्थाहून वेगळा आहे. मुख्य म्हणजे, दुर्योधनाची अट भीम, अर्जुन, नकुल व सहदेव ह्या चौघांनीही युधिष्ठिराला भर सभेत खोटा पाडला पाहिजे अशी होती; त्यांच्यांतल्या

एकाने खोटा पाडला तरी पुरे, अशी नव्हती. पाहा: (२.६२.२४–५; ६३.२०). मेहेंदळ्यांच्या मतांविषयी आणखीही प्रश्न उभे करता येतात; पाहा : Hiltebeitel (2001; p. 258).

१८. पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ७२). युधिष्ठिर हे कथापात्र सत्प्रवृत्त आहे हे निर्विवाद. तथापि, त्याला सत्प्रवृत्तींचा पुतळा म्हणणे संहितेशी कितपत सुसंगत आहे असा प्रश्न पडतो. युधिष्ठिर व त्याचे द्यूत ह्याविषयीची भीम, अर्जुन व द्रौपदी ह्यांची मते लेखात आधी येऊन गेली आहेत. सत्प्रवृत्तींचा पुतळा ह्या कल्पनेशी ती मते सुसंगत आहेत का? होऊ घातलेल्या युद्धात कर्णाचे सारथ्य करताना शल्याने कर्णाचा तेजोभंग करायचा ही युधिष्ठिराने शल्याबरोबर उद्योगपर्वात केलेली गुप्त मसलत तसेच, त्याने द्रोणांच्या प्रश्नाला दिलेले व्याजयुक्त उत्तर ह्या गोष्टीही ह्या संदर्भात आठवतात. व्यासांनी आपल्यापुढे उभा केलेला युधिष्ठिर सत्प्रवृत्त पण – महाभारतातल्या इतर सर्व कथापात्रांसारखा – सदोष आहे, असे आम्हाला दिसते. प्रस्तुत प्रसंग, आमच्या मते, सभा-पर्वात वर्णिलेल्या द्यूताशी सुसंगत आहे.

१९. "A part of himself, weakened by addiction to gambling, was at war with his judgment [that gambling is bad] and in his heart of hearts Yudhishira desired to play. In his discussion with Sakuni, we see this inner conflict." See Rajagopalachari (2001; p. 105).

२०. पाहा : Krishna Chaitanya (1985; p. 170-87).

२१. "gambler's frenzy".

२२. पाहा : Lipner (1998; p. 197-211).

२३. पाहा : Hill (2001; p. 302-9).

२४. पाहा : van Buitenen (1975; pp. 5-6, 27-30). तथापि, कथेच्या वास्तवात शिरून पाहता, वैदिक काळच्या त्या प्रथेची कथापात्रांना जाणीव होती, असे संहितेत कोठेही दिसत नाही. प्रस्तुत लेखातील विवेचनावरून हे उघड व्हावे की, 'युधिष्ठिर द्यूत खेळायला का गेला, आणि तो ते बेफामपणे का खेळला?' ह्या प्रश्नांना 'वैदिक काळची प्रथा' हे फान बायटनन ह्यांचे उत्तर पटण्यासारखे नाही. फान बायटनन ह्यांच्या त्या मताच्या, वेगळ्या मुद्द्यांवरून केलेल्या खंडनासाठी पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ४८–५४), Sohnen-Thieme (1999).





अनुक्रमणिका

ग्रंथजिज्ञासा

# विभाजनाची अकथित कहाणी

श्री. मा. भावे

नरेंद्र सिंग हे मध्यप्रदेशातील सरिला या संस्थानाचे वारस. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ते इंग्रज सैन्यात अधिकारी म्हणून काम करीत होते. मार्च १९४७ मध्ये लुई मौंटबॅटन हा अखंड हिंदुस्थानचा शेवटचा राजप्रतिनिधी म्हणून आला व त्याने नरेंद्र सिंग यांची नेमणूक स्वीय सहायक (एद-द-काम्प) म्हणून केली. त्यामुळे इंग्रजी राज्याच्या शेवटच्या काही महिन्यांतील राजकारणाची त्यांना जवळून माहिती झाली. भारत स्वतंत्र झाल्यावर जून १९४८ पर्यंत मौंटबॅटन भारताचा मुख्याधिकारी (गव्हर्नर-जनरल) होता. त्याही काळात नरेंद्र सिंग हे त्याचे स्वीय सहायक होते.

नंतर नरेंद्र सिंग भारत सरकारच्या परराष्ट्र-सेवेत रुजू झाले. त्या सेवेत असताना अनेक महत्त्वाच्या पदांवर त्यांनी कामे केली. देशातील व विदेशांतील महत्त्वाच्या व्यक्तींना भेटण्याची त्यांना संधी मिळाली. इंग्लंड व अमेरिका (संयुक्त संस्थाने) या देशांनी हिंदुस्थानाच्या फाळणीविषयी केलेला (व त्या काळी गुप्त असलेला) पत्रव्यवहार आणि सरकारी अहवाल त्यांना वाचायला मिळाले. किंबहुना, हिंदुस्थानची फाळणी व त्याविषयीचे राजकारण हा त्यांनी अभ्यासाचा एक विषय म्हणूनच हाती घेतला. १९४८ पासून १९८५ पर्यंत ते परराष्ट्र-सेवेत होते.

२००५ साली नरेंद्र सिंग यांचा 'द शॅडो ऑफ् द ग्रेट गेम-दी अन्टोल्ड स्टोरी ऑफ इंडियाज् पार्टिशन' हा ४३६ पानांचा ग्रंथ 'हार्पर कॉलिन्स पब्लिशर्स इंडिया' व 'दी इंडिया-टुडे ग्रुप' यांनी संयुक्तपणे प्रसिद्ध केला. त्याच वर्षी त्याचे पुनर्मुद्रणही झाले! पुस्तकाची किंमत ५०० रुपये आहे.

(१)

हिंदुस्थानाची फाळणी हा एक हादरवून टाकणारा राष्ट्रीय अनुभव होता. फाळणीबरोबरच धार्मिक दंगली झाल्या आणि लाखो माणसे त्यांच्या परंपरागत परिसरातून उखडून टाकली गेली. कुटुंबातील माणसांची ताटातूट झाली. त्यांची वतनवाडी व व्यवसाय हिरावून घेतले गेले. फाळणीशी संबंधित असणारा हा हृदयद्रावक भाग अनेक अभ्यासकांच्या संशोधनाचा विषय झाला आहे. गेल्या वीस वर्षांत विशेषतः जवाहरलाल नेहरू विद्यापीठ आणि दिल्ली विद्यापीठ येथील संशोधकांनी फाळणीशी निगडित अत्याचार व होरपळ यांवर अनेक पुस्तके लिहिली आहेत.

फाळणी या घटनेची पृष्ठभूमी, कॉंग्रेस व मुस्लिम लीग या प्रमुख राजकीय पक्षांचे नेते आणि त्यांचे डावपेच, हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्यकर्ते व त्यांचे इंग्लंडमधील वरिष्ठ यांचे आडाखे आणि योजना यांचा आढावा घेणारीही खूप पुस्तके गेल्या वीस वर्षांत प्रसिद्ध झाली आहेत. या प्रकारच्या पुस्तकांतून केलेली चर्चा प्रामुख्याने मुस्लिम लीगने केलेला पाकिस्तानविषयीचा ठराव (१९४०), कॉंग्रेसने केलेली 'हिंद छोडो' चळवळ, त्याआधी आलेला क्रिप्स आयोग व नंतर आलेली त्रिमंत्री-योजना, अशा महत्त्वाच्या घटनांमागे असलेला त्या त्या हितसंबंधीयांच्या विचारांचा धागा शोधणारी असते. श्री. नरेंद्र सिंग यांचे पुस्तक या दुसऱ्या गटात मोडणारे आहे. पण त्याचे महत्त्वाचे वैशिष्ट्य असे आहे की, इंग्रजी राज्यकर्त्यांनी, दुसऱ्या महायुद्धानंतर अस्तित्वात येऊ घातलेल्या भूराजकीय व्यूहाचा अभ्यास करून, पाकिस्तानची निर्मिती केली, याचे साधार व सविस्तर विवेचन श्री. नरेंद्र सिंग यांनी केले आहे.

हे विवेचन वाचल्यावर आपल्याला कळून चुकते की, दुसरे महायुद्ध सुरू झाल्यापासून कॉंग्रेसच्या नेत्यांनी जे निर्णय घेतले, ते सकृद्दर्शनी स्वाभाविक व स्वाभिमानाचे आणि दुसऱ्या महायुद्धामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीचा फायदा उठवून देशाला स्वातंत्र्याकडे घेऊन जाणारे वाटले, तरी त्या निर्णयांचा वापर इंग्रजी मुत्सद्द्यांनी फार शिताफीने केला व अखेरीस देशाची फाळणी कॉंग्रेस पक्षाने नाइलाजाने पण स्वतःहून स्वीकारली, असे चित्र निर्माण केले.

अनुक्रमणिका

पाकिस्तान हे एक उपटसुंभ राष्ट्र जन्माला घालून पाश्चात्त्य भांडवलदारी देशांच्या हाती साम्यवादी रशियाच्या दक्षिणे-कडील विस्ताराला पायबंद घालील, असा भिडू दिला. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात अमेरिकेकडून इंग्लंडवर, हिंदी जनतेला अधिकाधिक राजकीय सुधारणा देशात याव्यात यासाठी जबरदस्त दडपण येत होते. त्या दडपणाला इंग्लंडमधील सरकारने ज्या कौशल्याने तोंड दिले, ते वाचताना तर या मुरब्बी मुत्सद्द्यांचे कौतुक वाटल्याखेरीज राहत नाही. हा साराच इतिहास अतिशय गुंग करून टाकणारा असून श्री. नरेंद्र सिंग यांनी त्याचा वेधक उलगडा केला आहे.

(२)

३ सप्टेंबर १९३९ या दिवशी इंग्लंड व फ्रान्स यांनी जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारले. त्या वेळी हिंदुस्थानातील केंद्रीय सरकार राजप्रतिनिधीच्या (व्हॉइसरॉय) हाती होते. त्या वेळी हिंदुस्थानात ११ प्रांत होते व त्या प्रांतांतील राज्य-कारभार लोकांनी (त्या काळात मताधिकार सर्वांना नव्हता. एकूण लोकसंख्येपैकी फक्त १४% लोकांना मताधिकार होता.) निवडून दिलेली कायदेमंडळे मंत्रि-मंडळांच्या मार्फत पाहत होती. १९३७ साली झालेल्या निवडणुकीत ११ प्रांतांपैकी ८ प्रांतांत काँग्रेस पक्षाची मंत्रिमंडळे होती. उरलेल्या तीन प्रांतांत (सिंध, पंजाब व बंगाल) स्थानिक पक्षांची मंत्रिमंडळे होती. केंद्रामध्ये दोन सभागृहे होती. यात खालच्या सभागृहात ३७५ जागा होत्या. या जागांपैकी १२५ जागा संस्थानिकांच्या प्रतिनिधींसाठी होत्या, तर २५० जागांवर ब्रिटिश हिंदु-स्थानातील ११ प्रांतांचे प्रतिनिधी असणार होते. वरच्या सभागृहात २६० जागा होत्या. त्यांपैकी ११० जागा संस्थानांच्या प्रतिनिधींसाठी होत्या. या सुधारणा जारी करताना इंग्रजांचा हेतू असा होता की, संस्थानिकांचे प्रतिनिधी राजप्रतिनिधीच्या नियंत्रणात राहातील व राजप्रति-निधीच्या अधिकारी मंडळाला सभागृहांकडून विरोध होणार नाही. पण झाले असे की, संस्थांनांनी आपले प्रतिनिधी केंद्रीय विधिमंडळांवर पाठविलेच नाहीत. नरेंद्र सिंग यांचे असे सांगणे आहे की, चर्चिलने आपले दूत पाठवून आणि राजप्रतिनिधींचे संस्थानांवर लक्ष ठेवणारे जे खाते होते, त्यातील अधिकाऱ्यांकरवी संस्थानिकांना पटवून दिले की, या नव्या सुधारणांपासून तुम्ही लांब राहा. (३६). १९३५ सालच्या सुधारणांतील संघराज्य-विधि-मंडळाचा भाग पूर्णतः अमलात आलाच नाही.

युद्ध सुरू झाले तेव्हा लॉर्ड लिनलिथगो हा राज-प्रतिनिधी होता. त्याने असे जाहीर करून टाकले की, हिंदुस्थानही इंग्लंड व फ्रान्स यांच्या बाजूने युद्धात उतरला आहे! त्यानंतर दोन महिन्यांपर्यंत काँग्रेसने इंग्रजी राज्य-कर्त्यांवर असा दबाव आणला की, 'युद्धानंतर हिंदुस्थानाला स्वातंत्र्य देऊ व युद्धकाळात केंद्रीय राज्यव्यवस्थेत काँग्रेसला सहभागी करून घेऊ', असे आश्वासन देत असाल तरच आमच्याकडून तुमच्या युद्धप्रयत्नांना सहकार्य मिळेल. हे आश्वासन मिळाले नाही म्हणून आठही प्रांतांतील मंत्रि-मंडळांनी राजिनामे दिले.

आठ प्रांतांतील राज्ये घालवून काँग्रेसने घातक चूक केली. एकतर ही राज्ये काँग्रेसच्या हाती असती, तर काँग्रेसला राजप्रतिनिधीशी वाटाघाटी करताना अधिक सबळपणे बोलता आले असते. काँग्रेस असे गर्भितपणे सुचवू शकली असती की, आम्हाला सांभाळून घेतले नाहीत, तर आमच्या प्रांतांतून तुम्हाला रसद मिळणार नाही. दुसरे, १९३७ च्या निवडणुकीत मुस्लिम लीगचा (इथून पुढे लीग) पूर्ण पराभव झाला होता. एकाही प्रांतात लीगचे राज्य नव्हते. आता असे झाले की, काँग्रेसच्या हातीही सरकारे नसल्याने काँग्रेस व लीग एकाच पातळीवर आली. जीना व लीग यांनी राजप्रति-निधीला पूर्ण सहकार्याचे आश्वासन दिले व राजकीय पटावर प्रमुख भूमिका वठवायला लीग सिद्ध झाली. तिसरे, काँग्रेस उघडपणे सरकारशी सहकार्य करण्याची भाषा बोलत असली, तरी राज्ये सोडण्याचा काँग्रेसचा निर्णय असहकाराचाच संकेत देत होता. राज्यावर राहून जर काँग्रेसने असहकार केला असता, तर ती मंत्रिमंडळे बरखास्त करणे राजप्रतिनिधीला जड गेले असते. इंग्लंड-मधील मजूर पक्ष व अमेरिका यांना ते आवडले नसते. चौथे असे की, काँग्रेसचे सहकार्य असो किंवा नसो, सरकारच्या युद्धप्रयत्नांना कोणतीच खीळ बसत नव्हती. दर महा दोन लाख तरुण सैन्यात भरतीसाठी पुढे येत होते. (सरकारकडून दरमहा फक्त पन्नास हजार जवानांना सैन्यात नोकरी दिली जात होती.) देशातील भांडवलदार




युद्धजन्य मागणी पुरी करण्यासाठी पुढे सरसावले होते व सैन्यासाठी लागणारी सामग्री कारखान्यांतून निर्माण करीत होते (५६). म्हणजे राष्ट्रवाद्यांना आणखी राजकीय सवलती द्याव्यात, यासाठी काहीच कारण नव्हते.

(३)

लिनलिथगोने यानंतर देशातील पुढाऱ्यांशी युद्ध-सहकार्याविषयी बोलणी करण्यास सुरुवात केली. ४ सप्टेंबर १९३९ या दिवशी त्याने गांधी व जिना यांची भेट घेतली. ४ सप्टेंबरच्या भेटीत गांधींनी राज्यप्रतिनिधीला सांगितले की, 'इंग्लंडविषयी माझ्या मनात फार आत्मीयतेच्या भावना आहेत. शत्रूच्या बॉम्ब-फेकीखाली लंडनमधील ऐतिहासिक महत्त्वाच्या इमारती बेचिराख होतील, ही कल्पनाच मला असह्य वाटते.' गांधींनी सरकारला आश्वासन दिले की, त्यांनी पहिल्या महायुद्धात ज्याप्रमाणे सैन्य-भरतीसाठी मदत केली होती, तशीच या वेळीही ते करतील.

पण झाले असे की, गांधींची ही भूमिका काँग्रेस पक्षाला पसंत पडली नाही. हिंदुस्थान गुलाम असताना त्याने सरकारला मदत करणे विपरीत दिसले असते. तसेच इंग्लंड जर (जर्मनीने आक्रमिलेल्या) राष्ट्रांना स्वतंत्र करण्यासाठी लढत असेल, तर इंग्रजांनी हिंदुस्थानाला प्रथम स्वातंत्र्य दिले पाहिजे. इंग्लंडच्या याच सरकारने पूर्वी, स्पेनमध्ये यादवी युद्ध चालले असताना फ्रँको (पुढे स्पेनचा हुकूमशहा झालेला राज्यकर्ता) या फॅसिस्ट पुढाऱ्याच्या सैन्याला मदत केली होती. तेव्हा साम्राज्यवाद्यांना मदत करणे काँग्रेसला अजिबात मान्य नव्हते. बऱ्याच वादानंतर काँग्रेस कार्यकारिणीने असा ठराव केला की, गांधींनी राजप्रतिनिधीची पुनः भेट घ्यावी व 'लढाई संपल्यावर लगेचच हिंदुस्थानाला स्वातंत्र्य देऊ', अशी घोषणा राजप्रतिनिधीने करावी असा आग्रह धरावा.

२६ सप्टेंबर १९३९ रोजी गांधी व लिनलिथगो यांची पुनः भेट झाली. या वेळी लिनलिथगोने गांधींना तुसडेपणाने सांगितले की, 'तुम्ही म्हणता तशा प्रकारचे निवेदन सरकार करील, याची मुळीच शक्यता नाही. आता आम्ही जीवन-मरणाचा लढा देत आहोत. अशा स्थितीत केंद्रीय सत्तेत काँग्रेसचा शिरकाव आम्ही होऊ देणार नाही. हा लढा लोकशाहीसाठीचा नाही तर हिटलरच्या जग जिंकण्याच्या महत्त्वाकांक्षेला पायबंद घालण्याचा आहे.' नंतर लिनलिथगोने सूचकपणे म्हटले की, 'काँग्रेस ही काही देशातली एकमेव राजकीय संघटना नाही. देशात मुसलमान आहेत, संस्थानिक आहेत, इतर राजकीय पक्ष आहेत. त्यांच्याही हितसंबंधांचा विचार झाला पाहिजे.' लिनलिथगोने भारतमंत्र्याला या भेटीचा वृत्तांत पाठविताना म्हटले की, 'संस्थानिक व मुसलमान यांना इंग्रजांच्या करवी घडवून आणलेल्या घटनेच्या जाळ्यात गुंतवून ठेवायचे व नंतर आपल्या (हिंदू) बहुमताच्या जोरावर तसेच डांबून धरायचे, असा काँग्रेसचा उद्देश आहे.' (४१)

४ सप्टेंबरलाच लिनलिथगोने जिनांची भेट घेतली, त्यापूर्वी जिनांचा एक चेला खालिक–उझ्झमान भारतमंत्री लॉर्ड झेटलंड याला भेटला होता. तेव्हा खालिक–उझ्झमानने झेटलंडपुढे असा प्रस्ताव मांडला होता की, हिंदुस्थानात मुस्लिम बहुसंख्या असलेली स्वायत्त राज्ये निर्माण करावीत व त्या राज्यांचे इंग्लंडशी संरक्षण-करार व्हावेत. ही योजना झेटलंडला फारच फायद्याची वाटली होती. खालिक-उझ्झमानने झेटलंडला असेही सांगितले होते की, मुस्लिम लीग इंग्रज सरकारची कायमच अंकित राहील; कारण इंग्रज नसतील तर आमची काय दशा होईल, ते सांगवत नाही. ह्या पृष्ठभूमीवर जिना व लिनलिथगो यांची भेट झाल्याने ती साहजिक अधिक गहिरी व राजकीय दृष्टीने दीर्घ परिणामी ठरली. त्या वेळेस काँग्रेस मंत्रिमंडळांनी राजीनामे दिलेले नव्हते. जिनांनी सुरुवातीलाच सुचविले की, 'काँग्रेसी मंत्रिमंडळांना हाकलून द्या. ती तुम्हाला कधीच मदत करणार नाहीत. काँग्रेसची इच्छा तुम्ही (इंग्रज राज्यकर्ते) व आम्ही (मुसलमान) अशा दोघांचा नायनाट करायची आहे. 'मग जिनांनी खालिक उझ्झमानचेच म्हणणे लिनलिथगोसमोर ठेवले की, 'हिंदु बहुसंख्येच्या प्रांतांपासून मुस्लिम बहुसंख्येचे प्रदेश वेगळे काढा. या वेगळ्या प्रदेशांवर मुसलमानांनी इंग्रजांच्या सहकार्याने राज्य करावे.'

जिनांचे ईप्सित आणि लिनलिथगोचे राजकीय आडाखे यांचा असा मेळ बसल्यावर जिनांना अनुकूल अशाच सगळ्या गोष्टी होऊ लागल्या. पंजाबातील सत्ता

'युनियनिस्ट पार्टी' कडे होती. तेथील पंतप्रधान सिकंदर हयातखान हा नावाला, अखिल हिंदुस्थानच्या पातळीवर, मुस्लिम लीगचा सभासद होता खरा; पण हिंदू व शीख पंथियांच्या प्रतिनिधींशी आघाडी करून तो राज्य चालवीत होता. हिंदू व शीख यांच्या विरुद्ध युनियनिस्ट पार्टी असे चित्र त्याला उभे करायचे नव्हते. पण लिनलिथगोने सिकंदर हयात खान याच्यावर दडपण आणून त्याला जिनांचे नेतृत्व खुलेपणाने स्वीकारण्यास भाग पाडले. मुसलमानांची (काँग्रेसइतकीच) बळकट संघटना असली पाहिजे व त्या संघटनेचा (म्हणजे लीगचा) एकमेव नेता असला पाहिजे, हे लिनलिथगोने सिंकदर हयातखानास पटवले. इथून पुढे इंग्रज राज्यकर्त्यांनी जिना हेच मुसलमानांचे एकमेव प्रवक्ते आहेत, अशा रीतीने त्यांना (जिनांना) वागविण्यास सुरुवात केली. लिनलिथगोचे आभार मानून जिनांनी त्याला आश्वासन दिले की, 'काँग्रेसने अखंड हिंदुस्थानचा आग्रह सोडला आणि ज्या प्रांतात मुसलमान अल्पसंख्य आहेत तेथील मुसलमानांच्या हक्कांना (घटनात्मक) संरक्षण देण्याचे मान्य केले, तरच मी काँग्रेसशी मिळते घेईन.' जिनांनी अखंड हिंदुस्थानच्या कल्पनेला अशी पाचर मारून लिनलिथगोच्या हाती काँग्रेसला तोंड देण्यासाठी एक हत्यारच मिळवून दिले. त्यानंतर २३ ऑक्टोबर १९३९ रोजी काँग्रेसच्या प्रांतिक मंत्रिमंडळांनी राजीनामे दिले. त्या राजीनाम्यांचा इंग्लंडमध्ये असा अर्थ लावला गेला की, युद्ध-प्रयत्नात काँग्रेसला इंग्रज सरकारशी सहकार्य करावयाचे नाही.

पुढे २४ मार्च १९४० रोजी, लाहोरला भरलेल्या लीगच्या अधिवेशनात, जिनांनी लीगकडून असा ठराव करून घेतला की, 'मुस्लिम जमात ही एक वेगळे राष्ट्र आहे. तिला राष्ट्र म्हणून नांदण्यासाठी स्वतःचा प्रदेश व स्वतःचे राज्य हवे.' हा ठराव करण्यापूर्वी ११ दिवस म्हणजे १३ मार्च १९४० ला जिनांनी लिनलिथगोला आपल्या बेताची पूर्ण कल्पना दिली होती. जिनांनी म्हटले होते की, मुस्लिम-बहुल प्रदेशात मुसलमानांनी इंग्रजांच्या साहाय्याने राज्य चालवावे. मुसलमानांची लहकरी ताकद एवढी आहे की, ज्या भागात हिंदू बहुसंख्य आहेत, त्या प्रदेशातील (अल्पसंख्य) मुसलमानांचीही काळजी ते घेऊ शकतात. जिनांची इतकी तयारी असल्याने लिनलिथगोला खात्री वाटू लागली, की हिंदी लोकांना नवीन राजकीय सवलती देण्याची वेळच इतक्यात येणार नाही. (५०-५१)

मे १९४० मध्ये नेव्हिल चेंबर्लेनच्या सरकारने राजीनामा दिला आणि चर्चिलच्या (१८७४-१९६५) नेतृत्वाखाली सर्वपक्षीय सरकार राज्यावर आले. चर्चिलचा मित्र एमरी हा भारतमंत्री झाला. चर्चिलच्या मताने हिंदुस्थान हा केवळ भूप्रदेश होता. ते काही राष्ट्र नव्हते. त्यामुळे 'हिंदुस्थानचे स्वातंत्र्य' ही पोकळ कल्पना होती. पण चर्चिलच्या मंत्रिमंडळात मजूर पक्षही होता. हिंदुस्थानला राजकीय सुधारणा दिल्या पाहिजेत, असा या पक्षाचा आग्रह होता. त्यामुळे नवीन भारतमंत्र्याने इंग्लंडच्या संसदेत हिंदुस्थानविषयीच्या धोरणाचे प्रकटन करावे, असा बूट निघाला. तेव्हा जिनांनी आग्रह धरला की, 'हिंदुस्थानच्या राज्यघटनेत कोणताही बदल करण्यापूर्वी त्या बदलाला देशातील मुख्य जमातींची संमती घेतली जाईल', असे त्या निवेदनातून सांगावे. २८ ऑगस्ट १९४० रोजी एमरीने जे निवेदन केले त्यात खालील मुद्दे होते : (अ) युद्ध संपल्यानंतर हिंदुस्थानला साम्राज्यांतर्गत स्वायत्तता (डोमिनियन स्टेटस्) देण्यात येईल; (आ) राजप्रतिनिधीच्या मंडळातील जागा वाढवून त्यात राजकीय पक्षांचे प्रतिनिधी घेण्यात येतील; (इ) एक युद्ध सल्लागार समिती स्थापन करण्यात येईल व (ई) इंग्रज सरकारवर हिंदुस्थानाच्या योगक्षेत्राची जबाबदारी आहे. ज्याच्या अधिकाराला हिंदुस्थानातील मोठ्या व शक्तिशाली गटांनी मान्यता दिलेली नाही, अशा कोणत्याही सरकारकडे इंग्रज सरकार राज्य करण्याची जबाबदारी सोपविणार नाही. इतकेच नव्हे तर अशा गटांनी या (नवीन) सरकारला मान्यता द्यावी, यासाठी त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करणार नाही. एमरीच्या या निवेदनामुळे हिंदुस्थानाला देऊ करण्यात येणाऱ्या कोणत्याही राजकीय सुधारणांना नकार देण्याचा अधिकारच जिनांना प्राप्त झाला.

खरेतर 'मुसलमानांचे एकमेव प्रवक्ते' हा अधिकार १९४० साली जिनांना मुळीचच मिळण्यासारखा नव्हता. मुस्लिम बहुसंख्य असणाऱ्या प्रांतांमध्येही लीगची मंत्रिमंडळे नव्हती. विशेष म्हणजे अशा प्रांतांतून जी मंत्रिमंत्रळे होती, त्यांना पाकिस्तानची मागणी मुळीच मान्य नव्हती.








'इस्लाम खतरेमें है' या आरोळीने जी घालमेल मुसलमान अल्पसंख्याकांच्या मनात होत असे तशी घालमेल मुस्लिम-बहुल प्रांतांतून होत नसे. किंबहुना 'इस्लाम खतरेमें है' ही घोषणाच त्या मुसलमानांना पराभूत मनोवृत्तीची द्योतक वाटे. अखंड हिंदुस्थानामध्ये मुसलमानांना हिंदूंच्या वर्चस्वाला मान देऊन मानहानी सोसत जगावे लागेल, ही कल्पनाच मुसलमानांतील कट्टर गटांना पटत नव्हती. एकतर हिंदू हे अनेक जाति-पंथांत विभागलेले होते. दुसरे म्हणजे हिंदू हे भेकड आहेत, पडते घेणारे आहेत, त्यांचे मुसलमानांच्या अरेरावीपुढे काही चालणार नाही, अशी त्यांची खात्री होती. थोडक्यात म्हणजे 'पाकिस्तान' ही एक उपटसुंभ कल्पना जिनांनी काढली होती व ब्रिटिश राज्यकर्त्यांनी त्यांच्या भावी भू-राजनीतीला ती कल्पना सोईस्कर होईल म्हणून उचलून धरली होती. (६७)

(४)

१९४१ सालच्या डिसेंबर महिन्यात जपानने पर्ल हार्बर येथील अमेरिकेच्या आरमारी तळावर बॉम्बहल्ला केला व अमेरिकेने जपान आणि जर्मनी यांच्या विरुद्ध युद्ध पुकारले. अमेरिका आपल्याबरोबर युद्धात उतरली, ही चर्चिलच्या दृष्टीने धन्यता वाटावी अशी गोष्ट होतीच; पण त्याबरोबर इंग्रजांपैकी जे चर्चिलसारखे कट्टर साम्राज्य-वादी होते त्यांना याची काळजीही वाटू लागली की, जपानशी लढताना हिंदुस्थानकडून रसद व सैनिक यांचा भरपूर पुरवठा व्हावा यासाठी हिंदुस्थानला नवीन राजकीय सुधारणा द्याव्यात, असा आग्रह अमेरिका धरणार. त्या आग्रहाला तोंड द्यायचे तर त्यासाठी आपण ४० च्या डिसेंबरात मुसलमानांना दिलेल्या आश्वासनाचा उपयोग करून घेता येईल; ही युक्ती एमरी व लिनलिथगो या दोघांनीही सुचविली.

अमेरिका युद्धात सामील झाल्यानंतर चर्चिलने अमेरिकेला जी पहिलीच भेट (जानेवारी ४२) दिली, तेव्हा अमेरिकेचा अध्यक्ष रुझव्हेल्ट (१८८२-१९४५) याने हिंदुस्थानचा प्रश्न काढलाच. चर्चिल सांगतो की, 'मी त्या वेळी रुझव्हेल्टला असे झणझणीत व पल्लेदार उत्तर दिले की, त्यानंतर त्याने कधीही (तोंडी बोलण्यात) हा विषय काढला नाही.' पण ब्रिटिश मजूर पक्ष चर्चिलच्या मंत्रिमंडळात होता व त्या पक्षाचा नेता क्लेमंट ॲटली (१८८३-१९६७) उपपंतप्रधान होता. त्याने असा विचार मांडला की, "जपान युद्धात उतरल्यानंतर तो सध्याच्या युद्धाला 'पौर्वात्य राष्ट्रे विरुद्ध पाश्चात्त्य साम्राज्यवाद' असे रूप देण्याची शक्यता आहे. आपण सध्या चीनला जपानविरुद्ध मदत करीत आहोतच. साहजिकच हिंदु-स्थानाला असे वाटते आहे की, चीन जर पाश्चात्त्य राष्ट्रांशी बरोबरीच्या नात्याने संबंध ठेवतो, तर आम्हालाही ती प्रतिष्ठा का मिळू नये? जपानविरुद्ध लढण्यासाठी चीन व हिंदुस्थान यांना बरोबर घेऊन आपण एक आशियाई राष्ट्रांची युती का निर्माण करू नये? ... तेव्हा मला असे वाटते की आपण एक प्रतिनिधी हिंदी नेत्यांशी वाटाघाटी करण्यास पाठवावा किंवा त्याला लिनलिथगोच्या जागी नवा राजप्रतिनिधी म्हणून नेमावे. त्याने कोणत्या चौकटीच्या मर्यादेत राहून वाटाघाटी करावयाच्या "हे ठरविण्यासाठी मंत्रिमंडळाची उपसमिती नेमावी." (१००-१०१)

चर्चिल हा फार मुरब्बी मुत्सद्दी होता. एमरी व लिनलिथगो यांनी सुचविलेले धोरण व ॲटलीने मांडलेली सूचना, त्याचबरोबर अमेरिकेकडून आणि मजूरपक्षाकडून वाटाघाटींसाठी होणारा आग्रह या सर्वांची सांगड घालून त्याने असा निर्णय घेतला की, क्रिप्स या मजूरपक्षीय पुढाऱ्याला हिंदुस्थानच्या ब्रिटिश सरकारचा दूत म्हणून हिंदी नेत्यांशी वाटाघाटींसाठी पाठवावे. त्याला खालील तत्त्वांवर वाटाघाटी करण्याचे अधिकार द्यावेत. (अ) युद्धानंतर हिंदी लोकांना त्यांची घटना करण्याचे अधिकार मिळतील. या घटनेनुसार त्यांनी ब्रिटिश कॉमन-वेल्थमध्ये स्वतंत्र राष्ट्र म्हणून राहावे किंवा बाहेर जावे. (आ) तोपर्यंतच्या काळात राजप्रतिनिधीच्या परिषदेत हिंदी राजकीय पक्षांच्या प्रतिनिधींना स्थान देण्यात येईल. त्यांना सर्व बाबतीत स्वायत्तपणे कारभार पाहता येईल. मात्र युद्ध चालविण्याचे अधिकार ब्रिटिशांकडेच राहतील. (ई) स्वातंत्र्य मिळाल्यानंतर निर्माण होणाऱ्या हिंदी राष्ट्रात सामील व्हायचे की नाही, हे ठरविण्याचा अधिकार प्रत्येक प्रांतांला व संस्थानाला असेल. त्यांतील हे तिसरे कलम फार महत्त्वाचे होते. हिंदी राजकीय पक्षांनी राजप्रतिनिधीच्या परिषदेत सामील होण्याचे ठरविले, तर

अनुक्रमणिका

त्यांनी भविष्यात होणाऱ्या फाळणीला आताच मान्यता दिली पाहिजे, असा या कलमाचा अर्थ होता. इथून पुढे इंग्रजांनी हिंदुस्थानला द्यावयाच्या राजकीय सवलतींचे जे जे मसुदे सुचविले – मग ती त्रिमंत्री योजना (१९४६) असो, ॲटलीने केलेली भारत सोडून जाण्याची घोषणा असो (२ फेब्रुवारी १९४७) किंवा ३ जून १९४७ ची प्रत्यक्ष फाळणीची योजना – त्या प्रत्येकात ब्रिटिश हिंदुस्थानातील कोणत्याही प्रांताला येऊ घातलेल्या नव्या राष्ट्रापासून वेगळे राहण्याचा हक्क कोणत्या ना कोणत्या रूपात दिलेला होता.

याच काळात अमेरिकेचा अध्यक्ष रुझव्हेल्ट व चीनचा अध्यक्ष जनरल चॅग कै शेक यांच्याकडून इंग्लंडला आग्रहाचे सांगितले जात होते की जपानकडून होत असलेले आक्रमण थांबविण्यासाठी हिंदी जनतेकडून मोठ्या प्रमाणात युद्धसाहाय्य व्हावे, अशी अपेक्षा आहे. तेव्हा इंग्लंडने आपले हिंदुस्थानला नवीन राजकीय सुधारणा देण्याविषयीचे धोरण स्पष्टपणे मांडावे. अमेरिकेचा विशेष दूत ॲव्हटेल हॅरेमन (१८९१–१९८६) याने चर्चिलची भेट २६ फेब्रुवारी १९४२ रोजी घेतली व रुझव्हेल्टचा निरोप चर्चिलला सांगितला. चर्चिल म्हणाला, की आम्ही त्याचाच विचार करतो आहोत. (त्याच दिवशीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत क्रिप्सला पाठवण्याचा निर्णय झाला.) नंतर चर्चिल म्हणाला की, 'हिंदी सैन्यापैकी ७५% सैन्य मुस्लिम धर्मीयांचे आहे. (हे खरे नव्हते. फक्त ३५% सैनिक मुसलमान होते.) हिंदुस्थानात १० कोटी मुसलमान आहेत. हिंदुस्थानाच्या उत्तर भागातील प्रांतांतून बहुतेक सैनिक येत असतात व या प्रांतांत काँग्रेसला कडवा विरोध आहे. हिंदुस्थानाच्या दक्षिणेकडील भागातील लोकांत लढण्याचा जोश व हिंमत नाही. त्यामुळे मुसलमान दुरावतील अशी कोणतीही सुधारणा आम्हाला सुचविता येणार नाही.' यानंतर चर्चिलने स्वतःच रुझव्हेल्टला एक तार पाठविली. तीत त्याने कळविले होते की, 'हिंदुस्थानात १० कोटी मुसलमान आहेत. सैन्यात त्यांची संख्या मोठी आहे. येत्या लढाईत त्यांचाच आपल्याला उपयोग होणार आहे. तेव्हा मुसलमानांना दुखविता येणार नाही. तसेच ३–४ कोटी अस्पृश्य लोक आहेत. त्यांच्याबद्दल आमच्या काही जबाबदाऱ्या आहेत. संस्थानांतून ८ कोटी लोक राहातात. या संस्थानिकांशी आम्ही तहांनी बांधले गेलो आहोत. जपानचा हल्ला होऊ घातला असताना हिंदुस्थानात अराजक माजावे, अशी आमची इच्छा नाही.' तरीही रुझव्हेल्टने चर्चिलला पुनःपुनः आग्रह चालविलाच की, (जपानशी चाललेले युद्ध) जिंकायचे असेल, तर हिंदी जनतेचे सहकार्य लागेल व त्या दृष्टीने राजकीय सुधारणांचा मसुदा तयार झाला पाहिजे.

क्रिप्स २२ मार्च १९४२ ला दिल्लीला आला आणि ६ एप्रिल १९४२ रोजी विशाखापट्टणवर जपानचा बॉंबहल्ला झाला. त्या वेळी हिंदुस्थानात फक्त ८ विमानविरोधी तोफा होत्या; आणि जपानी विमानांना तोंड देतील अशी विमानेही नव्हती. मलाया, इंडोनेशिया जिंकून जपानी सैन्य ब्रह्मदेशात आगेकूच करीत होते व ब्रिटिश सैन्य माघार घेत होते. परिस्थिती हातघाईची होती. अशा वेळी क्रिप्सने काँग्रेस पुढाऱ्यांना आमिष दाखविले की, 'तुम्ही राजप्रतिनिधीच्या परिषदेत जा. ह्या परिषदेचे काम इंग्लंडच्या मंत्रिमंडळाच्या कामाच्या धर्तीवर चालेल आणि राजप्रतिनिधीचा नकाराधिकार आपण अगदी नियंत्रित ठेवू. तसेच संरक्षण-खाते फक्त युद्धकाळापुरते सरसेनापतीकडे राहील.' अशी बोलणी करण्याचा अधिकार क्रिप्सला मुळीच नव्हता. त्यामुळे लिनलिथगोने चर्चिलकडे आपली हरकत नोंदवल्यावर चर्चिलने क्रिप्सला कळविले की, 'काँग्रेसला गोंजारण्याच्या वादात तू तुला मंत्रिमंडळाने जे अधिकार दिलेले आहेत, त्यांचे उल्लंघन करशील.' हा इशारा मिळताच क्रिप्सने काँग्रेसला जी गुप्त आश्वासने दिली होती, ती परत घेतली.

तेव्हा काँग्रेसने क्रिप्सच्या योजनेत असलेली पाकिस्तानची बीजे उघडी केली व देशाची फाळणी आपणास अमान्य असल्याचे सांगितले. मात्र त्याच ठरावात काँग्रेसने असेही म्हटले होते की, 'एखाद्या प्रदेशातील जनतेला हिंदी संघराज्यात राहायचे नसेल, तर त्या प्रदेशाच्या मर्जीविरुद्ध त्याला संघराज्यात राहण्याची सक्ती आम्ही करणार नाही.' (११०–१११). अशा रीतीने क्रिप्सच्या मध्यस्थीचा बोजवारा उडाला. तथापि, त्यानंतर इंग्लंड जगाला असे म्हणायला मोकळे झाले की, "आम्ही प्रामाणिक प्रयत्न केले. काँग्रेसच्या नेत्यांशी ज्याची अतिशय जवळीक अशा क्रिप्सला आम्ही शक्य तितक्या उदार






अटींचा तर्जुमा देऊन पाठविले. पण हिंदी नेत्यांत कशावरच एकमत होत नाही, त्याला काय करावे?" (११४).

स्वतः नरेंद्र सिंग यांचा अभिप्राय असा आहे की, काँग्रेसने क्रिप्सच्या योजनेचा स्वीकार करायला हवा होता. तसे केल्यास राजप्रतिनिधीच्या परिषदेत त्यांना शिरकाव करून घेता आला असता व सत्ता हाती आली असती. नंतर काँग्रेसने राज्यातील सत्ता सोडली होती ती त्यांच्या हाती आली असती व लीगला आळा बसला असता. जिना व लिनलिथगो यांच्यातील वाढते सहकार्य थांबवता आले असते. युद्ध संपल्यानंतर जी घटनासमिती स्थापन होणार होती, तीमधून फुटून निघण्याचे कोणत्याच प्रांताने मनात आणलेही नसते. राजप्रतिनिधीच्या प्रभुत्वाखाली असलेल्या काँग्रेसच्या सरकाराला अमेरिकेचा पाठिंबा मिळाला असता व हिंदुस्थानचे तुकडे व्हावेत याला अमेरिका अजिबात अनुकूल नव्हती. (११७-१८)

**(५)**

यानंतर काँग्रेसने १९४२ चे प्रसिद्ध 'हिंद छोडो' आंदोलन सुरू केले. ते सुरू होण्याआधी व आंदोलन जोरावर असताना अमेरिकेने व चीनने इंग्लंडकडे पुनः जोराचा आग्रह धरला की, युद्धपरिस्थिती अतिशय बिकट आहे. अशा वेळी हिंदी जनतेने उठाव करावा आणि इंग्रज सरकारची शक्ती तो उठाव दाबून टाकण्यात खर्च व्हावी, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. काही विधायक मार्ग या अडचणीतून काढला पाहिजे. खुद्द अमेरिकन जनमतही या वेळी ब्रिटिश साम्राज्यवादाचा तीव्र निषेध करीत होते. पण चर्चिलने या सर्व टीकेला काहीही भीक घातली नाही. नोव्हेंबर १९४२ मध्ये 'हिंद छोडो' चळवळ ओसरली व जपानचे हिंदुस्थानावर आक्रमण होण्याची शक्यताही मंदावली. त्यानंतर अमेरिकेतील लोकमत व अमेरिकन राज्यकर्ते यांचाही हिंदुस्थानातील घडामोडींविषयीचा रस कमी झाला.

१९४३ साली लिनलिथगोची कारकीर्द संपली व त्या सालच्या सप्टेंबरमध्ये लॉर्ड वेव्हेल हा राजप्रतिनिधी म्हणून काम करू लागला. लिनलिथगोच्या काळात वेव्हेल हा सरसेनापती आणि राजप्रतिनिधीच्या परिषदेत संरक्षण-विभागाचा सदस्य म्हणून होता. त्याला हिंदी राजकारणाची जवळून माहिती होती. त्याला राजप्रतिनिधी म्हणून नेमताना चर्चिलचा हेतू असा होता की, वेव्हेल स्वतःची कोणतीच धोरणे न ठरवता आपल्या (पक्षी : चर्चिलच्या) आज्ञेप्रमाणे वागेल. चर्चिल स्वतः युद्धानंतर हिंदुस्थानात तर काय पण इंग्लंडमध्येही काय प्रश्न उद्‌भवतील, याचा विचारच करीत नव्हता. चालू युद्ध जिंकायचे यातच त्याचे विचार गुंतले होते. लिनलिथगोने मात्र वेव्हेलला सांगितले की, आणखी तीस वर्षे तरी हिंदुस्थानाची जबाबदारी ब्रिटिशांकडेच राहील. तो असेही म्हणाला होता की, काँग्रेसचे पुढारी बरे तुरुंगात आहेत व गेल्या तीन-चार वर्षांत मुसलमानांच्या राजकीय भूमिकेला वजन मिळाले आहे. (१७०) लिनलिथगोचे हे म्हणणे खरेच होते. बंगालमधील मंत्रिमंडळ मुळात मुस्लिम लीगचे नव्हते. ते कृषक-प्रजा-पक्षाचे होते. पण बंगालच्या राज्यपालाच्या आग्रहामुळे म्हणा किंवा मुळातच या पक्षात असलेल्या मुसलमानी आमदारांचे मन फिरल्यामुळे म्हणा हे आमदार खुऱ्हावर्दीच्या मुस्लिम लीगमध्ये सामील झाले व बंगालमध्ये लीगचे सरकार आले. आसाम व सरहद्द प्रांतातील काँग्रेस मंत्रिमंडळांनी राजीनामे दिल्यावर तेथे लीगने मंत्रिमंडळे स्थापिली होती. खरा प्रश्न पंजाबचा होता. पंजाब हे तर जिनांना हव्या असलेल्या पाकिस्तानचे हृदय होते व तेथे खिज्र हयातखान याची युनियनिस्ट पार्टी राज्य करीत होती. सिंधमध्ये लीगचे सरकार होते, पण त्याचे लीगशी फारसे जमत नव्हते.

अशा स्थितीत जिना व लीग यांचे वजन वाढावे अशी संधी गांधींमुळे चालून आली. १९४४ च्या मध्याला वेव्हेलने गांधींची तुरुंगातून सुटका केली व लवकरच गांधी व जिना यांच्यात वाटाघाटी सुरू झाल्या. गांधींचा प्रस्ताव होता की, इंग्रज निघून गेल्यावर जिनांना जे प्रांत पाकिस्तानात यावेत असे वाटते, त्या प्रांतातील प्रत्येक जिल्ह्यात सार्वमत घेण्यात येईल व त्या जिल्ह्यांचे मत पाकिस्तानचे बाजूने पडले तर ते पाकिस्तानात जातील. हा प्रस्ताव पूर्वी राजगोपालाचारी यांनीही मांडला होता. जिनांनी हा प्रस्ताव धुडकावूनच लावला. पण या वाटाघाटींचा परिणाम असा झाला की, अनेक संधिसाधू मुसलमान पुढारी व पाकिस्तानात नोकरी मिळण्यासाठी लालचावलेले मुसलमान लीगकडे वळले. या वाटाघाटी फिसकटल्या त्या दिवशी वेव्हेलने आपल्या दैनंदिनीत

अनुक्रमणिका

लिहिले, 'गांधींच्या नेतृत्वाचे भांडे आता उघडे पडले आहे.' त्याने चर्चिलला लिहिले की, 'आता इंग्लंडच्या सरकारने महत्त्वाची चाल खेळली पाहिजे.' तथापि चर्चिलला हिंदुस्थानासाठी कोणतीही नवी योजना करणे मान्य नव्हते. वेव्हेलने जेव्हा फारच आग्रह धरला तेव्हा चर्चिलने, ५ महिन्यांच्या घासाघिशीनंतर, वेव्हेलला लंडनला बोलावले.

वेव्हेल लंडनला पोचला २३ मार्च १९४५ रोजी. तोपर्यंत युरोपातील लढाई संपत आली होती आणि अमेरिका, इंग्लंड व रशिया या दोस्त राष्ट्रांत धुसफुशी चालू होत्या. युद्ध संपल्यावर रशियाशी भांडण उभे राहणार हे ठरून गेले होते. रशियाच्या, इराण व इराणचे आखात इथपर्यंत, आपला टापू वाढविण्याच्या हालचाली सुरू झाल्या होत्या. अशा वेळी ब्रिटिश लष्कराच्या योजना विभागाने 'युद्धोत्तर काळातील हिंदुस्थानाचे व हिंदी महासागराचे रक्षण' नावाचा अहवाल तयार केला. त्यात म्हटले होते की, युद्धानंतर हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यातच राहील आणि (न राहिला तरी) पुढे होणाऱ्या युद्धात इंग्लंडच्या बाजूने राहील, याची काळजी घेतली पाहिजे. कारण (१) हिंदुस्थानातील लष्करी तळावरून हिंदी महासागर, मध्यपूर्व आणि दूर-पूर्व या भागांतील देशांतून सैन्य पाठविता येऊ शकते; (२) इंग्लंडपासून मध्यपूर्व, दूरपूर्व व ऑस्ट्रेलिया या भूपृष्ठांवरच्या दळणवळणाला हिंदुस्थान उपयोगी पडेल; (३) हिंदुस्थानाच्या मनुष्यबळाचा उपयोग साम्राज्याच्या संरक्षणासाठी होऊ शकतो. याच अहवालात म्हटले होते की, हिंदुस्थानाला स्वायत्तता दिली, तरी त्याच्या वायव्येकडील मुलखात आपले विमानदल ठेवता आले पाहिजे. तेथून रशियातील तेलसाठ्यांवर विमानाचे हल्ले करता येतील. रशियाशी युद्ध झालेच तर अमेरिका युद्धात हमखास उतरेल. अशा वेळी हिंदी महासागराभोवतालच्या राष्ट्रांचा गट दोस्तांच्या बाजूने उभा राहिला पाहिजे. (१८२)

वेव्हेल इंग्लंडमध्ये होता त्या काळात चर्चिलबरोबर आणि ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या हिंदुस्थान समितीबरोबर वेव्हेलच्या खूप वाटाघाटी झाल्या. याच काळात अमेरिकेचा झक्कू इंग्लंडमागे लागलाच होता की, हिंदुस्थानला नव्या सुधारणा दिल्या पाहिजेत. या सर्व घुसळणीतून असे ठरले की, राजप्रतिनिधीच्या परिषदेचा विस्तार करावा; त्या परिषदेत सवर्ण हिंदूंचे व मुसलमानांचे प्रतिनिधी समान संख्येचे असावेत; अशा स्वरूपाचा प्रस्ताव हिंदी राजकीय पुढाऱ्यांची एक मजलीस भरवून तिच्या पुढे ठेवावा. त्यापूर्वी काँग्रेस पुढाऱ्यांना तुरुंगातून सोडावे. अंतस्थ रीत्या असेही ठरले की, राजप्रतिनिधीच्या परिषदेच्या स्वरूपाविषयी जो निर्णय होईल त्याला जिनांची मान्यता असायला हवी. चर्चिलला ह्यातले काहीच मान्य नव्हते; पण जेव्हा त्याची खात्री पटली की, या खेळीतून काहीच निष्पन्न होणार नाही आहे, तेव्हा त्याने या कार्यक्रमाला मान्यता दिली.

यानंतर २५ जून १९४५ रोजी सिमल्याला सर्व पक्ष, शिखांचे व अस्पृश्यांचे प्रतिनिधी, ब्रिटिश हिंदुस्थानातील प्रांतांचे आजी-माजी मुख्यमंत्री (यांना त्या काळी 'पंतप्रधान' म्हणत असत) अशांची जंगी परिषद भरली. काँग्रेस मंत्रिमंडळांनी ३९ सालीच राजिनामे दिले होते, पण त्या मंत्रिमंडळांतील मुख्यमंत्र्यांनाही बोलाविले होते. गांधी सिमल्याला आले होते, पण त्यांनी परिषदेत भाग घेतला नाही. नेहरूंना परिषदेला बोलावलेच नव्हते. जिना हे या परिषदेचे नायक होते.

या परिषदेतून निर्णायक असा कोणताच ठराव निष्पन्न व्हावा, अशी वेव्हेल व त्याचे इंग्लंडमधील वरिष्ठ यांची इच्छाच नव्हती. त्यामुळेच 'आपण एकटेच काय ते मुसलमानांचे प्रवक्ते आहोत', हा जिनांचा दावा वेव्हेलने फेटाळून लावला नाही. जिनांनी परिषदेत लांबलचक भाषण दिले. त्यात त्यांनी पाकिस्तान होणे गरजेचे आहे, हिंदू-मुसलमान एकत्र नांदू शकत नाहीत इ. मुद्दे लावून धरले. जिनांच्या भाषणाचा उपयोग ब्रिटिश सरकारने अमेरिकेत करावयाच्या प्रचारासाठी भरपूर करून घेतला. हिंदुस्थानाला नवीन राजकीय सुधारणा देणे किती अवघड आहे आणि कोणतीही सुधारणा देताना मुसलमानांचे (म्हणजे जिनांचे) समाधान करणे किती गरजेचे आहे, याची अमेरिकेला या प्रचारातून जाणीव करून देण्यात आली.

राजप्रतिनिधीच्या परिषदेवर मुसलमानांचे प्रतिनिधी म्हणून जी नावे सुचवायची ती सुचविण्याचा अधिकार माझ्या एकट्याचा आहे, हा जिनांचा हट्ट होता. काँग्रेस

हा हिंदूंचा पक्ष आहे. त्याला स्वतःच्या वाट्याला आलेल्या पदांवरही मुसलमान मनुष्याचे नामांकन करण्याचा अधिकार नाही, अशी ताठर भूमिका जिनांनी घेतली. त्यामुळे मुसलमानांमध्ये जिनांचे वजन अतिशय वाढले व पंजाब, सिंध, बंगाल येथील मुसलमान पुढारी निष्प्रभ झाले. तसेच काँग्रेसने परिषदेत सामील होऊन अप्रत्यक्ष-रीत्या असे मान्य केले, की इंग्रजांकडून सत्ता हाती घेण्याची योग्यता असणारा काँग्रेस हा एकमेव पक्ष नाही.

**(६)**

सिमला परिषदेनंतर दोन मोठ्या घटना घडल्या. इंग्लंडमध्ये निवडणुका होऊन चर्चिल व त्याचा हुजूर पक्ष यांचा प्रचंड पराभव झाला. चर्चिलच्या पराभवाचा एक अर्थ असा लावण्यात आला की, ब्रिटिश जनतेला आता साम्राज्याची जबाबदारी नकोशी झाली आहे. दुसरी घटना म्हणजे अमेरिकेने जपानवर महासंहारक अणुबाँब टाकून जपानला शरण यायला लावले. अमेरिकेच्या या अफाट संहारक शक्तीमुळे अमेरिकेचा दरारा अतोनात वाढला आणि अमेरिकेकडून इंग्लंडवर येणारे साम्राज्य-विरोधी वजन इंग्लंडला धुडकावून लावता येईना. नवा पंतप्रधान ॲटली याने आत्मचरित्रात म्हटलेच आहे की, अमेरिकेच्या दडपणामुळे हिंदुस्थानावर राज्य करणे अशक्य झाले. (१८९). याच वेळी इंग्लंडचा आर्थिक सल्लागार केन्स याने इशारा दिला की, साम्राज्याच्या बंदोबस्तासाठी दर वर्षी दोनशे कोटी पौंड खर्च होतो तो आता झेपणारा नाही. इंग्लंड कर्जाखाली मोडून पडण्याची वेळ आली आहे. इंग्लंड आणि हिंदुस्थान यांच्यातील व्यापारात, दुसरे महायुद्ध सुरू होण्याच्या पूर्वीच, इंग्लंड तोट्यात आलेले होते. त्यामुळे नव्या सरकारने असे ठरवूनच टाकले होते, की हिंदुस्थानातून काढता पाय घ्यावयाचा; मात्र ते करताना स्वतंत्र हिंदुस्थानाचे सरकार आपल्याला अनुकूल राहील, अशी काळजी घ्यावयाची. कारण, पाकिस्तान जरी निर्माण झाले तरी उरलेला हिंदुस्थानदेखील एक मोठे, बलाढ्य आणि भू-राजकीय दृष्ट्या महत्त्वाचे राष्ट्र राहाणार यात शंका नव्हती. त्यामुळे काँग्रेसला व विशेषतः नेहरूंना गोंजारूनच जे पाहिजे ते घडवून आणायचे, असे मजूर पक्षाचे धोरण होते.

नवीन मंत्रिमंडळ काँग्रेसला अनुकूल असणार, अशी वेव्हेलची अटकळ होतीच. त्यामुळे त्याने जिना व मुस्लिम लीग यांना हिंदी राजकारणात केवढे महत्त्व आहे व त्यांच्या संमतिविना हिंदुस्थानला कोणतीही सुधारणा देणे किती धोक्याचे आहे, हे आपल्या वरिष्ठांना पटविण्याचा प्रयत्न केला. काँग्रेस व लीग यांच्यात कोणतीही तडजोड होणे अशक्य असल्याने हिंदुस्थानची फाळणी अटळ आहे; मात्र ही फाळणी करताना पंजाब व बंगाल या प्रांतांचेही विभाजन करावे, अशी त्याची सूचना होती. मजूर पक्षाला फाळणी अमान्य होती असे नाही; पण उघडपणे त्याच्या सरकारची भूमिका अशी होती की, आम्हाला हिंदुस्थान अखंडच ठेवायचा आहे. ॲटलीचे म्हणणे असे होते की, फाळणी करावी; पण शक्यतो असा देखावा करावा की, हिंदी पक्षातील मतभेदांमुळे नाइलाजाने फाळणी करणे भाग पडते आहे.

नोव्हेंबर–डिसेंबर १९४५ मध्ये क्रिप्स व नेहरू यांच्यात पत्रव्यवहार झाला. दोघांचेही या विषयावर एकमत झाले की, आता नव्याने काँग्रेसने सरकारविरोधी चळवळ करू नये व तडजोडीने मार्ग काढावा. नंतर क्रिप्सने नेहरूंना विचारले की, 'तुम्ही राजप्रतिनिधी (व्हाइसरॉय) असता तर काय हालचाली केल्या असत्या?' त्यावर नेहरूंनी एक फार मोठे पत्र पाठविले. त्यातील महत्त्वाचे मुद्दे असे होते : (१) हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यात येईल असे जाहीर करावे. (२) निवडून आलेल्या प्रतिनिधींनी नवी घटना ठरवावी. (३) इंग्रजांनी फाळणीला उत्तेजन देऊ नये. हिंदुस्थान हे एक लवचीक संघराज्य असावे. केंद्राकडे संरक्षण, परराष्ट्र धोरण, दळणवळण एवढीच खाती असावीत. (४) कोण्या प्रदेशाला देशापासून विभक्त व्हायचे असेल, तर त्यासाठी त्या प्रदेशात सार्वमत घ्यावे. त्या प्रदेशातील ज्या लोकांना विभक्त होणे मान्य नसेल, त्यांना हिंदुस्थानात राहण्याचा हक्क असावा. (थोडक्यात, बंगाल व पंजाब यांची फाळणी करावी.) (५) वायव्य सरहद्द प्रांत फुटून निघण्याची शक्यता नसल्याने पाकिस्तान होण्याची शक्यताच नाही. (६) लीगला निवडणुकीत मिळालेली मते ही पाकिस्तानला दिलेली मते आहेत, हे खरे नाही. लीगचा उपद्रव मोडून काढता येईल. (७) संस्थानांचे विलीनीकरण व्हावे किंवा संस्थानांचे गट करून त्यांची संघराज्ये करावीत.




अनुक्रमणिका

या पत्रव्यवहारातून क्रिप्स व ॲटली यांची खात्री पटली की, पाकिस्तानाबाबत काँग्रेसची भूमिका लवचीक आहे. त्यामुळे असे ठरविण्यात आले की क्रिप्स, भारतमंत्री पेथिक लॉरेन्स आणि नौसेनामंत्री ॲलेक्झांडर यांचे शिष्ट-मंडळ हिंदी नेत्यांशी चर्चा करण्यासाठी पाठवावे. त्रिमंत्रि-शिष्टमंडळ हिंदुस्थानाकडे निघताना ॲटलीने तीन मार्ग-दर्शक तत्त्वे शिष्टमंडळाला घालून दिली. (i) ज्या सुधारणा तुम्ही सुचवाल, त्यात अल्पसंख्याकांचे अधिकार शाबूत राहिले पाहिजेत; (ii) हिंदुस्थान व हिंदी महासागर या प्रदेशाच्या संरक्षणाला धक्का पोचता कामा नये; आणि (iii) ब्रिटिशांनी हिंदुस्थान सोडल्यावर संस्थानांना त्यांचे भवितव्य ठरविण्याचे स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. शिष्ट-मंडळाच्या हिंद-भेटीविषयी इंग्लंडच्या लोकसभेत चर्चा झाली, तेव्हा ॲटलीने आपल्या भाषणात हळून एक वाक्य सोडून दिले की, 'अल्पसंख्याकांच्या हक्काविषयी आम्हाला चिंता वाटते खरी; पण बहुसंख्याकांच्या राजकीय प्रगतीला पायबंद घालण्याचा अधिकारही अल्पसंख्याकांना आम्ही देणार नाही.' (२०५)

१९४५ सालच्या हिवाळ्यात प्रांतिक विधिमंडळां-साठीच्या निवडणुका झाल्या. विशेष म्हणजे मुस्लिम बहुल प्रांतातही लीगचे यश अगदीच तुटपुंजे होते. सरहद्द प्रांतात काँग्रेस सत्तेवर आली. पंजाबमध्ये युनियनिस्ट पक्षाने हिंदू व शीख प्रतिनिधींना बरोबर घेऊन बहुमत साधले. आसामवर जिना हक्क सांगत होते; पण तिथेही काँग्रेसनेच मंत्रिमंडळ स्थापले. बंगाल व सिंधमध्ये मात्र लीगकडे सत्ता आली. पण सिंधमध्येदेखील लीग व विरोधक यांना समान जागा मिळाल्या होत्या. जिथे मुसलमान अल्पसंख्य होते अशा प्रांतातील मुसलमानांच्या राखीव जागांवर मात्र लीगने प्रचंड विजय मिळविले. या निवडणुकांनी पुनः हे सिद्ध झाले, की जर मुसलमान बहुसंख्येने असतील तर त्यांना "इस्लाम खतरेमें है" या इशाऱ्याचे भय वाटत नाही.

त्रिमंत्रि-शिष्टमंडळाने आपली योजना १६ मे १९४६ रोजी जाहीर केली, ती अशी : (अ) जुलै १९४६ मध्ये घटना-समितीच्या निवडणुका होतील. निवडून आलेल्या प्रतिनिधींचे तीन गट होतील. (i) आसाम गाळून अमुस्लिम बहुसंख्या असलेल्या प्रांतांचे प्रतिनिधी; (ii) मुस्लिम बहुसंख्या असणारे वायव्येकडील प्रांत म्हणजे पंजाब, सरहद्दप्रांत, सिंध व बलुचिस्तान. (iii) बंगाल आणि आसाम. दुसऱ्या व तिसऱ्या गटांतील प्रतिनिधी आपापल्या प्रांत-गटांसाठीच्या घटना तयार करतील. दहा वर्षांनंतर या गटांना भारतीय संघराज्यातून फुटून निघण्याचा हक्क असेल. प्रांतांची ही गटवारी अनिवार्य असून आपला गट सोडून दुसऱ्या गटात जाण्याचा कोणाही प्रांताला अधिकार नाही. (आ) सर्व गटांचे प्रतिनिधी मिळून संपूर्ण देशाची घटना ठरवितील. मात्र ही घटना ठरविताना संघराज्याकडे संरक्षण, परराष्ट्र धोरण आणि दळणवळण एवढ्या तीनच विषयांची जबाबदारी राहील, अशी तरतूद केली पाहिजे. (इ) घटना-समितीच्या निवडणुका होण्या-पूर्वीच राजप्रतिनिधीच्या परिषदेची पुनर्रचना करून तिच्या-वर राजकीय पक्षांचे प्रतिनिधी घेतले जातील.

त्रिमंत्रि-योजना जिनांना स्वीकार्य वाटली, कारण आज नाही तरी दहा वर्षांनी पाकिस्तान अस्तित्वात येईल अशी जवळजवळ ग्वाहीच त्या योजनेने दिली होती. काँग्रेसने ही योजना स्वीकारली, कारण ताबडतोब मिळणाऱ्या सत्तेचे आकर्षण त्यांना वाटले. प्रांतांचे गट तयार करण्याविषयी काँग्रेसचे मत असे होते की, प्रत्येक प्रांताला आपल्यासाठी नेमलेल्या गटात जायचे की नाही हे ठरविण्याचा अधिकार आहे. त्यांचा असा विश्वास होता की, गट (ii) पासून सरहद्द प्रांत आणि गट (iii) मधून आसाम हे प्रांत बाहेर राहिले, तर पाकिस्तान निर्माण होण्याची शक्यताच नाहीशी होईल. अर्थात, त्रिमंत्रियोजनेचा काँग्रेसने लावलेला अर्थ बरोबर नव्हता. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मात्र सर्व इच्छा सफळ-संपूर्ण झाल्या होत्या. काँग्रेसच्या खांद्यावर सत्तेचे जू ठेवल्यावर काँग्रेस सरकारच्या विरोधात ४२ च्या लढ्यासारखा लढा करण्याची शक्यता उरली नाही. दुसरे, पाकिस्तान निर्माण करण्यातील अडचणींचा बागूलबोवा उभा करून पुढेमागे जिनांना तुटकेफुटके पाकिस्तान स्वीकारायला भाग पाडण्याची शक्यता निर्माण झाली. तिसरे, अमेरिका व मजूर पक्षातील हिंदीवादी लोकांना असे दाखविता आले की, अखंड हिंदुस्थानासाठी आम्ही आटोकाट प्रयत्न करीत आहोत.

जिना आणि वेव्हेल दोघांनाही अनेक शंका अस्वस्थ

अनुक्रमणिका






करीत होत्या. घटना समितीत काँग्रेसचे बहुमत असणार होते. समजा, घटनासमितीने जर जाहीर केले की, आपण सार्वभौम आहोत, हिंदुस्थान स्वतंत्र आहे व त्रिमंत्रि-मंडळाची योजना आमच्यावर बंधनकारक नाही तर ब्रिटिश सरकार व राजप्रतिनिधी यांच्यापाशी घटना समितीला विरोध करण्याला कोणते साधन असेल? जिनांना पंजाब व सरहद्द प्रांतात अगदीच तुटपुंजा पाठिंबा होता. तिथली मंत्रिमंडळे लीगच्या हाती नव्हती. ह्या प्रांतांनी घटनासमितीत काँग्रेसशी सहकार्य करायचे ठरविल्यास जिनांना आजवर जे महत्त्व दिले गेले व त्यांच्या महत्त्वाकांक्षा फुलविल्या, त्याचे काय होईल? जिनांनी घटनासमितीच्या विरोधात बंड केले, तर ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यातले मुसलमान अधिकारी जिनांना सामील होतील का? मुख्य म्हणजे ब्रिटिश (मजूरपक्षीय) सरकार व काँग्रेस यांच्यात संगनमत झाले, तर वेव्हेल व जिना यांची दामटीच वळेल. हा सर्व विचार करून जिनांनी त्रिमंत्रि-योजना धुडकावून लावण्याचे ठरविले. त्यांना ही संधी मिळाली ती नेहरूंनी ६ जुलै १९४६ रोजी पत्रकार-परिषदेत केलेल्या घोषणेमुळे. नेहरूंनी मुंबईत जाहीर केले की, त्रिमंत्रि-योजनेतील घटना-समिती स्थापण्यापुरता भागच काँग्रेसला मान्य आहे.

२७ जुलै १९४६ ला मुंबईत मुस्लिम लीगचे अधिवेशन भरले व त्यात ठराव करण्यात आला की, लीग त्रिमंत्रि-योजना फेटाळत आहे. जिनांनी त्या दिवशी जाहीर केले की, आता आम्ही सनदशीर मार्गाला रामराम ठोकला असून इथून पुढे आम्ही प्रत्यक्ष लढा सुरू करणार आहोत. त्याप्रमाणे लीगने १६ ऑगस्ट १९४६ रोजी कलकत्त्यात 'प्रत्यक्ष लढा दिवस' एक मोठा दंगा घडवून आणून साजरा केला. तेथून पुढे जातीय दंगली होतच राहिल्या. जिनांना ब्रिटिश सरकारला हे दाखवून द्यायचे होते की, हिंदू व मुसलमान एकत्र राहू शकत नाहीत.

**(७)**

त्रिमंत्रि-योजनेप्रमाणे आता राजप्रतिनिधी-परिषदेत घटना-समितीच्या सदस्यांपैकी काहींची नेमणूक करून त्यांच्या हाती कारभार सोपवायचा होता. वेव्हेलचे मत असे होते की, परिषदेत काँग्रेस व लीग या दोघांचेही प्रतिनिधी असावेत. पण जिना व लीग यांनी आपले प्रतिनिधी देण्यास नकार दिला. सरहद्द प्रांत व आसाम यांना त्यांच्यासाठी त्रिमंत्रि-योजनेत ठरविलेल्या गट (ii) व गट (iii) (अनुक्रमे) मध्येच जाणे सक्तीचे आहे किंवा नाही, याचा निकाल ॲटलीच्या मंत्रिमंडळाने अद्याप केला नव्हता. तो निकाल लीगच्या बाजूने – म्हणजे त्याच गटात जाणे सक्तीचे आहे असा – देऊन जिनांची समजूत काढावी, असे वेव्हेलचे सांगणे होते. पण ॲटलीच्या मंत्रिमंडळाने निकाल राखून ठेवला. त्यामुळे मध्यावधी सरकारात काँग्रेसचेच प्रतिनिधी २ सप्टेंबर १९४६ रोजी प्रविष्ट झाले. खरेतर ही, वर सांगितल्या-प्रमाणे, राजप्रतिनिधी–परिषद होती (व्हाइसरॉयचे कौन्सिल); पण लोक त्याला 'मंत्रिमंडळ' म्हणू लागले व नेहरू 'उपाध्यक्ष' होते त्यांना 'पंतप्रधान' असे संबोधू लागले. हे 'मंत्रिमंडळ' स्थापन झाल्यावर अमेरिकेने हिंदुस्थानशी स्वतंत्रपणे राजनैतिक संबंध जोडले व आपली वकिलात दिल्लीत स्थापन केली. ब्रिटिश सरकारला व वेव्हेलला हे आवडले नव्हते; पण त्यांनी या गोष्टीला मान्यता दिली.

यानंतर वेव्हेल नेहरूंना आग्रह करू लागला की, देशात जातीय सलोखा नांदायचा असेल, तर लीगलाही मध्यावधी सरकारात बोलावले पाहिजे. शेवटी कंटाळून नेहरूंनी सांगितले की, "तुम्हीच जिनांशी काय ते बोला." खरेतर नेहरूंनी सांगायला हवे होते की, जोवर लीग त्रिमंत्रि योजनेला मान्यता देत नाही व घटनासमितीत भाग घेण्यास तयार होत नाही, तोवर लीगचे प्रतिनिधी मंत्रिमंडळात येऊ शकत नाहीत. घटनासमितीसाठीच्या निवडणुका जुलै १९४६ मध्ये झाल्या होत्या. एकूण २९६ जागांपैकी लीगकडे फक्त ७३ जागा होत्या. (मुसल-मानांसाठी राखीव जागा ७८ होत्या.) काँग्रेसकडे मोठे बहुमत होते. जिना व लीग यांचा आग्रह होता की, ॲटलीच्या सरकारने सरहद्द प्रांत व आसाम कोणत्या गटात आहेत याचा निश्चित निर्णय करावा, मगच आम्ही घटना-समितीत येऊ. या वादामुळे वेव्हेल घटना-समितीचे अधिवेशनच बोलावीत नव्हता. दुसऱ्या बाजूने अमेरिका आपले वजन वापरून 'घटना-समितीची सभा बोलवा' असा पिच्छा पुरवीत होते.

शेवटी ९ डिसेंबर १९४६ रोजी घटना-समितीची






बैठक बोलविण्यात आली. त्यापूर्वी आसाम व सरहद्द प्रांत यांनी कोणत्या गटात असावे, याविषयी निर्णय व्हायला हवा होता. त्यासाठी ब्रिटिश सरकारने २ डिसेंबर ते ६ डिसेंबर १९४६ या काळात लंडन इथे काँग्रेस व लीगचे नेते व शिखांचे नेते बलदेवसिंग यांची परिषद बोलावली. तथापि, त्या परिषदेतही निर्णय होऊ शकला नाही. तेव्हा ब्रिटिश सरकारने गट-प्रणालीच्या प्रश्नावरील आपला खुलासा खालीलप्रमाणे दिला : "गटाने घ्यावयाचे निर्णय साध्या बहुमताने घ्यावयाचे आहेत." याचा अर्थ असा की, आसाम-बंगाल गटातील आसामविषयीचा निर्णय आसामातील एकही प्रतिनिधी त्या निर्णयाला अनुकूल नसला, तरी होऊ शकतो. यामुळे नेहरू-पटेल व काँग्रेस यांनी मोठा क्षोभ व्यक्त केला. पण, त्यांच्या मंत्रिमंडळाने राजीनामा दिला नाही. ९ डिसेंबरला घटनासमितीची बैठक भरली. त्यात नेहरूंनी एक ठराव मांडला. त्या ठरावात म्हटले होते की, "ही घटनासमिती पूर्ण गांभीर्याने आपला पक्का निर्धार जाहीर करीत आहे की, हिंदुस्थान हे एक स्वतंत्र व सार्वभौम गणराज्य राहील" .... याचा अर्थ, स्वातंत्र्यानंतर हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यातील स्वायत्त देश म्हणून राहणार नाही.

याच काळात अमेरिकेचे परराष्ट्र खाते हिंदुस्थानातील घडामोडींवर बारीक नजर ठेवून होते. अमेरिकेचा परराष्ट्र-मंत्री डीन ॲचिसन व अमेरिकेचा हिंदुस्थानातील दूत (हा दुय्यम वकील होता.) मेरेल हे लीग-काँग्रेस-ब्रिटिश यांच्यातील वाटाघाटींवर पडद्याआडून प्रभाव टाकू इच्छीत होते. ६ डिसेंबर १९४६ ला इंग्लंडच्या सरकारने गट-प्रणालीवर दिलेला खुलासा अमेरिकेला पटला नव्हता. या वेळी इंग्लंडनेच अमेरिकेला सुचविले की, त्यांनी काँग्रेस नेत्यांशी बोलून ६ डिसेंबरचा खुलासा स्वीकारण्या-साठी त्यांचे मन वळवावे. ६ डिसेंबरच्या खुलाशानंतर लीगने मंत्रिमंडळात प्रवेश केला होता व मंत्रिपदे स्वीकारताना जाहीर केले होते की, आम्ही मंत्रिमंडळात जाऊन पाकिस्तानचे भांडण मांडणार आहोत. अद्याप लीगने घटनासमितीत प्रवेश केला नव्हता. जेव्हा अमेरिकेचा दूत मेरेल नेहरूंना भेटला तेव्हा मेरेलने असा प्रस्ताव मांडला की, एक लवचीक संघराज्य आणि दुबळे केंद्र सरकार अशी योजना काँग्रेसने स्वीकारावी. नंतर राज्य करताना आपोआपच संघराज्य अधिक दृढ होईल व केंद्र सरकार बळकट होईल. अमेरिकेचा हाच अनुभव आहे. नेहरू म्हणाले की, लीगला बरोबर घेऊन राज्य करताना हे शक्य नाही. ६ डिसेंबरचा खुलासा देऊन इंग्लंडच्या सरकारने जिनांच्या आडमुठेपणाला खतपाणीच घातले आहे. मुस्लिम लीगही अमेरिकेशी मैत्री करण्याचे प्रयत्न करीत होती. लियाकत अली (हा मंत्रिमंडळात लीगचा प्रमुख प्रतिनिधी होता) याने मेरेलला सांगितले की, जातीय-युद्ध हिंदुस्थानात पेटले आहे. हे असेच चालू राहिले तर रशिया हिंदुस्थानात ढवळाढवळ करू लागेल. रशियाला पायबंद घालण्यासाठी अमेरिका जी व्यूहरचना करील, त्याला लीगची साथ मिळेल.

काँग्रेस, लीग व इतर अल्पसंख्याक यांच्या प्रति-निधींच्या मंत्रिमंडळाला एकत्र काम करणे अशक्यच झाले होते. तेव्हा ७ फेब्रुवारी १९४७ रोजी लीगेतर मंत्र्यांनी वेव्हेलकडे अर्ज करून लीगच्या मंत्र्यांच्या राजी-नाम्याची मागणी केली. या मंत्र्यांचे म्हणणे असे होते की, काँग्रेसने ६ डिसेंबरचा खुलासा मान्य केला आहे व तरीही लीग घटनासमितीत भाग घेत नाही आहे. जिनांनी ३१ जानेवारी ४७ ला जाहीर केले होते की, ६ डिसेंबरचा खुलासा ही अप्रामाणिक खेळी होती. त्यामुळे आम्ही घटनासमितीत भाग घेणार नाही. (नरेंद्र सिंगांचे म्हणणे आहे की, इंग्रजांची जिनांच्या आडमुठेपणाला फूस होती.) ११ फेब्रुवारी अमेरिकेने ब्रिटनमधील आपल्या वकिलाला चौकशी करायला सांगितले की, (१) ब्रिटिश सरकार वेव्हेलला लीग मंत्र्यांना काढून टाकण्याची सूचना देणार आहे का? व (२) ब्रिटिश सरकार संस्थानिकांवर काँग्रेसशी जुळवून घेण्यासाठी दडपण आणणार आहे का?

तथापि ही चौकशी पुरी होण्याआधीच ॲटलीने ब्रिटिश लोकसभेत २० फेब्रुवारी १९४७ रोजी एक निवेदन केले. त्यात त्याने म्हटले होते की, (अ) जून १९४८ नंतर ब्रिटिशांची सत्ता हिंदुस्थानात राहणार नाही; (आ) केंद्रीय सत्ता सगळीच्या सगळी एका कोणाकडे द्यायची; किंवा काही प्रांतांकडे केंद्रीय सत्तेचे अधिकार सोपवायचे; अगर हिंदी जनतेचे हित लक्षात घेऊन दुसरी काही

व्यवस्था करावयाची, याचा विचार ब्रिटिश सरकारला करावा लागेल; (इ) संस्थानांवर ब्रिटिश हिंदुस्थानाचे जे सार्वभौमत्वाचे अधिकार आहेत, ते ब्रिटिश–हिंद सरकार आपल्या उत्तराधिकाऱ्यांच्याकडे सोपविणार नाही. (याचा अर्थ संस्थानिकांनी त्यांचे भवितव्य स्वतः ठरवावे.); (ई) वेव्हेलच्या जागी मौंटबॅटन याची राजप्रतिनिधी म्हणून नेमणूक करण्यात येत आहे. (२६१–६२)

भाषणाच्या सुरुवातीला ॲटलीने म्हटले होते की, संपूर्ण देशाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या घटनासमितीने जर जून १९४८ पूर्वी घटना तयार केली नाही, तर केंद्रीय सत्ता कोणाकडे सुपूर्द करायची हा प्रश्न येईल. घटना-समितीत आतापर्यंत (२० फेब्रुवारी ४७) मुस्लिम लीगचे प्रतिनिधी भाग घेत नव्हते. त्यामुळे वरील निवेदनाचा स्पष्ट अर्थ असा होता की, हिंदुस्थान सोडताना ब्रिटिश राज्यकर्ते हिंदुस्थानाची फाळणी करून जाणार. तसेच संस्थानिकांवरचे सार्वभौमत्वाचे छत्र गेल्यानंतर सर्व संस्थानिक स्वतंत्र होणार व हिंदुस्थानचे तुकडेतुकडे होणार.

मौंटबॅटनपुढे तीन कामे होती. (अ) हिंदुस्थानाच्या फाळणीला काँग्रेस पुढाऱ्यांची मान्यता मिळवायची. ॲटलीचा प्रथम पासून हाच उद्देश होता की, फाळणी तर करायची पण ती सगळ्यांच्या संमतीने झाली, असा देखावा उभा करायचा. (आ) काँग्रेसच्या हातातला सरहद्द प्रांत हिंदुस्थानापासून अलग करायचा. तो पाकिस्तानात गेला तर उत्तमच. (इ) जिनांना पाहिजे तसे, संपूर्ण पंजाब व संपूर्ण बंगाल यांचा समावेश असलेले, पाकिस्तान मिळावयाचे नाही, हे जिनांच्या गळी उतरवावयाचे.

इंग्लंडने अमेरिकेला कळविले की, ॲटलीच्या निवेदनाने दोन गोष्टी स्पष्ट केल्या आहेत. आम्ही पाकिस्तान निर्माण करण्याला बांधील नाही, तसेच केंद्रीय सत्ता एकाच अधिकार-स्थानाकडे सोपविली जावी, असाही आमचा आग्रह नाही. अमेरिकेची मात्र इच्छा होती, की हिंदुस्थानचे तुकडे-तुकडे होऊ नयेत. विशेषतः हैद्राबादसारख्या मोठ्या संस्थानांना तर फुटून जाण्यासाठी इंग्लंडने अजिबातच उत्तेजन देऊ नये.

मौंटबॅटन हिंदुस्थानात पोचण्यापूर्वीच काँग्रेसने असा ठरावही मंजूर केला की, पंजाब व बंगाल या दोन्ही प्रांतांचे मुसलमान व गैरमुसलमान भागांत विभाजन व्हावे. अमेरिकेचा वकिल मेरेल याने काँग्रेसचा हा ठराव अमेरिकेच्या परराष्ट्र खात्याला पाठविताना म्हटले की, 'अश रीतीने काँग्रेसने वर्षानुवर्षे जपलेले तत्त्व सोडून दिले आहे व हिंदू आणि मुसलमान एकत्र राहू शकत नाहीत, हा जिनांचा दावा स्वीकारला आहे.'

(८)

२२ मार्च १९४७ रोजी मौंटबॅटनने वेव्हेलकडून राजप्रतिनिधित्वाचे अधिकार आपल्याकडे घेतले. मौंट-बॅटनची स्वातंत्र्यापर्यंतची ५ महिन्यांची कारकीर्द व नंतर भारताने साम्राज्यांतर्गत स्वायत्तता (जेमिनियन स्टेटस्) स्वीकारल्यावर मुख्याधिकारी (गव्हर्नर जनरल) म्हणून जून १९४८ पर्यंत पार पाडलेली जबाबदारी यांचा आढावा घ्यावयाचा आहे. या विषयावर पुष्कळ लोकांनी खूप काही लिहिले आहे. इथे आपण फक्त तीन बाबींसंबंधात नरेंद्र सिंग काय म्हणतात ते पाहू. त्या तीन बाबी म्हणजे (१) फाळणीचा मुद्दा जिना व काँग्रेस यांना पटवून देणे. (२) वायव्य सरहद्द प्रांताला पाकिस्तानात घालणे. (३) काश्मिरवरील पाकिस्तानचे आक्रमण.

(१) मौंटबॅटन जिनांना प्रथम ५ एप्रिल १९४७ रोजी भेटला व नंतर ७ एप्रिल ते १० एप्रिल असे चार दिवस ओळीने भेटला. जिना म्हणाले की, सत्ता एकेका प्रांताकडे सोपवीत जावे. प्रांतांनीच आपापले गट तयार करावेत. नंतर मुसलमान बहुसंख्या असणारे प्रांत आपले स्वतंत्र राष्ट्र स्थापन करतील. त्यांनी मौंटबॅटनला धमकी दिली की, हिंदुस्थान एक ठेवण्याचा प्रयत्न कराल, तर मुसलमान सशस्त्र बंड करतील. मौंटबॅटन म्हणाला की, "तुम्ही जी पद्धती प्रांतांच्या बाबतीत लावू इच्छिता, तीच प्रांतातील प्रदेशांना का लावू नये? तुम्ही जे तत्त्व अवलंबत आहात, तेच वापरून पंजाब व बंगाल यांची फाळणीही करायला हवी." या वेळी जिनांना कळून चुकले की, आजपर्यंत आपल्याला जो 'नकाराधिकार' ब्रिटिशांच्या मेहेरबानीमुळे व प्रोत्साहनामुळे मिळत होता, तो आता गेला आहे. त्यामुळे ते पंजाब व बंगाल यांच्या फाळणीला तयार झाले. ते असेही म्हणाले, "तुम्ही मला किती मोडका प्रदेश द्यायचा असेल तो द्या; पण त्यावर माझा पूर्ण अधिकार चालला पाहिजे." (२७८) जिना

अनुक्रमणिका

असेही म्हणाले की, पाकिस्तानला (हिंदुस्थानच्या घटना-समितीने मागितल्याप्रमाणे) सार्वभौमत्व नको आहे. त्यांना साम्राज्यांतर्गत स्वायत्तता (डोमिनियन स्टेटस्) पुरेशी आहे. तिसरी गोष्ट जिनांनी सूचित केली, ती अशी की, पाकिस्तान हे इंग्लंडचे दोस्तराष्ट्र म्हणून राहील व जागतिक राजकारणात ब्रिटनची साथ देईल. (२७८)

१९४५ च्या ३० डिसेंबरला व्ही. पी. मेनन (इंग्रज सरकारच्या 'राजकीय सुधारणा' खात्यातील वरिष्ठ अधिकारी व वल्लभभाई पटेल यांच्या विश्वासातील गृहस्थ) यांनी पटेलांना दोन गोष्टी समजावून सांगितल्या. पहिली अशी की (नेहरूंनी मांडलेल्या स्वतंत्र सार्वभौम हिंदुस्थानच्या कल्पनेपेक्षा) साम्राज्यंतर्गत स्वायत्ततेवर समाधान मानले, तर सत्तांतर लवकर होईल; दुसरी गोष्ट अशी की, फाळणीला मान्यता दिल्यास उरलेल्या हिंदुस्थानाला बळकट केंद्रीय सरकार बनवता येईल व ते फायद्याचे ठरेल. पटेलांनी या दोन्ही प्रस्तावांना अनुकूलता दाखविली होती. मेनन यांनी पटेलांशी झालेल्या संभाषणाचा अहवाल वेव्हेलला दिला होता व तो त्याने इंग्लंडला भारतमंत्र्यांकडे पाठविला होता. मौंटबॅटननेही तो अहवाल पाहिला होता. दिल्लीला आल्यावर त्याने पटेलांकडे पाकिस्तानचा विषय काढलाच नाही. याबद्दलचे बोलणे तो मेननच्या मार्फत करीत असे. मौंटबॅटन नेहरूंशी वारंवार बोलणी करीत असे. ८ एप्रिल १९४७ रोजी त्याने नेहरूंना विचारले, "हिंदुस्थानातील सत्तांतरासाठी कोणता तोडगा तुम्ही माझ्या जागी असाल तर सुचवाल?" नेहरू त्यावर म्हणाले, "एखाद्या प्रदेशात जी जमात बहुसंख्याक असेल तिच्यावर कोणतीही घटना लादणे वाजवी होणार नाही." मौंटबॅटनने त्याचा अर्थ असा केला की, केवळ पंजाब व बंगाल येथील गैरमुसलमानी प्रदेशांना त्यांचे भवितव्य ठरविण्याचा हक्क द्यावा एवढेच नेहरुंचे सांगणे नाही, तर इंग्रजी राज्यातील सर्वच प्रांतांना - त्यात सरहद्द प्रांत आलाच - हे तत्त्व लावण्याला नेहरू अनुकूल आहेत. मौंटबॅटनला हे ठाऊक होते की, नेहरू-पटेलांनी फाळणीला मान्यता दिली, तरी त्याला गांधींची सम्मती असायलाच हवी. त्यामुळे मौंटबॅटन गांधींना वारंवार भेटला. एकदा (१ एप्रिल १९४७) गांधींनी सुचविले की, 'सारे मंत्रिमंडळ' जिना व लीग यांच्या हवाली करा. घटना समितीत काँग्रेसचे बहुमत असले तरी काँग्रेसचे सहकार्य लीगला मिळेल. मात्र जिनांनी हा प्रस्ताव नाकारल्यास काँग्रेसला हीच सवलत द्यावी." मौंटबॅटन म्हणाला, "तुम्ही तुमच्या या प्रस्तावाला काँग्रेस कार्यकारिणीची मान्यता आणा. मग मी लीगला हा प्रस्ताव देतो." गांधींनी ११ एप्रिलला मौंटबॅटनला कळविले की, काँग्रेस नेते यास अनुकूल नाहीत (२७०)

(२) वायव्य सरहद्द प्रांत ही मौंटबॅटनला एक डोकेदुखीच झाली होती. या प्रांतात ९५ टक्के वस्ती मुसलमानांची होती. तरी अब्दुल गफारखान व त्यांचे (सावत्र बंधू) खान साहेब यांच्या खुदा-ई-खिदमतगार या प्रभावी संघटनेच्या बळावर १९४५ साली देखील काँग्रेस त्या प्रांतात बहुमताने निवडून आली होती व त्या प्रांताने घटना समितीवर जे प्रतिनिधी पाठविले होते, ते काँग्रेसचेच होते. जर प्रांतांच्या प्रतिनिधींना आपण हिंदुस्थानात राहायचे की, बाहेर पडायचे याविषयी मत द्यायला सांगितले असते, तर सरहद्द प्रांताच्या प्रतिनिधींनी हिंदुस्थानात राहण्याचाच निर्णय घेतला असता. अशा स्थितीत निर्माण होणारे पाकिस्तान इतके तोटके झाले असते की, जिनांनी ते स्वीकारलेही नसते. खेरीज, सरहद्द प्रांत हिंदुस्थानात राहण्याने इंग्लंडचे भू-राजकीय डावपेचही कोलमडले असते.

मौंटबॅटन व त्याचा लष्करी सहाय्यक इस्मे यांची योजना अशी होती की, सरहद्द प्रांतात नव्याने निवडणुका घ्याव्यात. निवडून आलेल्या प्रतिनिधींना हिंदुस्थानात राहायचे, पाकिस्तानात जायचे की, स्वतंत्र राहायचे याचा निर्णय करण्याचे स्वातंत्र्य द्यायचे. आता कोणी म्हणेल की, यासाठी नव्या निवडणुका कशाला? काही महिन्यां-पूर्वीच निवडणुका झाल्या नाहीत का? त्यावर मौंटबॅटन-इस्मे यांचे उत्तर असे की, त्या निवडणुकांचे वेळी त्रिमंत्रि-योजना जनतेसमोर होती. त्या योजनेत प्रांतांचे गट करण्याचा प्रस्ताव होता. स्वतंत्र राष्ट्राचा पर्याय तेव्हा लोकांपुढे नव्हता. ही योजना नेहरूंपुढे मौंटबॅटनने ठेवली तेव्हा नेहरूंनी ती फेटाळून लावली. पण नेहरूंनी तत्त्वत: हे मान्य केले की, सत्तांतर होण्यापूर्वी लोकमत अजमाविले पाहिजे. (२८१) त्यानंतर एप्रिल १९४७ च्या अखेरीला मौंटबॅटनने नेहरूंना पटवून दिले की, सरहद्द प्रांतात

सार्वमत घ्यायचे व दोनच पर्याय लोकांसमोर ठेवायचे - पाकिस्तान की हिंदुस्थान (हे लक्षात ठेवण्यासारखे आहे की, नव्याने निवडणुका घेण्याचा विचार होता, तेव्हा इंग्रज राज्यकर्ते सरहद्द प्रांताचा स्वतंत्र देश हा पर्याय द्यायला तयार होते.) नेहरू आता तयार झाले. त्यांची एकच अट होती की, सार्वमत घेण्याची जबाबदारी प्रांताचा मुख्याधिकारी (गव्हर्नर) ओलाफ कॅरो याच्यावर न सोपविता खुद्द मौंटबॅटनने घ्यावी. ओलाफ कॅरो व प्रांताचे मुख्यमंत्री खानसाहेब यांच्यात प्रचंड वितुष्ट होते.

३ जून १९४७ ला फाळणीची घोषणा मौंटबॅटन करणार होता. त्यापूर्वी त्याला सरहद्द प्रांतात सार्वमत घेण्याच्या निर्णयाला काँग्रेसची मान्यता हवी होती. इकडे सरहद्द प्रांतात लीगने प्रचार चालविला होता की, खानबंधू प्रांतातील मुसलमानांना हिंदूंच्या कबजात ठेवणार आहेत! त्याला उत्तर म्हणून खानबंधू स्वतंत्र पख्तनिस्तानाचे नारे देत होते. अशा वेळी काँग्रेसकडून मौंटबॅटनला अशी विनंती करण्यात आली की, सरहद्द प्रांतातील सार्वमत घेताना लोकांपुढे तिसरा पर्यायही ठेवावा-स्वतंत्र देशाचा (म्हणजे पख्तुनिस्तानाचा.). ३ जूनला मौंटबॅटनने हिंदी नेत्यांची सभा बोलावली होती. फाळणीच्या योजनेला तो त्या नेत्यांची औपचारिक संमती घेणार होता. त्या सभेच्या थोड्या आधी त्याने नेहरूंपाशी सार्वमताचा विषय काढला. तो म्हणाला की (१) स्वतंत्र देश हा पर्याय ठेवण्याची कल्पना लीगला अजिबात मान्य होणार नाही. (२) देशाचे तुकडे होऊ नयेत यासाठी आपण स्वतंत्र बंगालची योजना बाजूला ठेवली. मग आता स्वतंत्र पख्तुनिस्तान कसे मान्य करायचे? (३) काँग्रेसच्या मर्जीखातर मी मुख्याधिकारी कॅरो याला काढून टाकतो. (४) संस्थानांनी स्वतंत्र राहू नये; हिंदुस्थानात किंवा पाकिस्तानात विलीन व्हावे, यासाठी मी लागेल ती मदत करीन.

हा चौथा मुद्दा नेहरू-पटेल यांना भावला व त्यांनी हिंदुस्थान/पाकिस्तान या द्विपर्यायी सार्वमताला मान्यता दिली. आता खानसाहेब यांची समजूत काढणे आले. मौंटबॅटन त्यांना म्हणाला की, आम्ही कोणत्याच प्रांताला 'स्वतंत्र होणे' हा तिसरा पर्याय दिला नव्हता. तो तुम्हाला का द्यावा? बरे, तुमची इच्छा हिंदुस्थानात राहायची आहे ना, मग तो निकाल सार्वमतातून मिळवा ना! (३०१) यानंतर खान अब्दुल गफारखान यांनी ठरविले की सार्वमतावर बहिष्कार टाकायचा. त्यांना असे वाटत होते की, सार्वमत घेताना फार मोठ्या प्रमाणात खोटे मतदान होईल आणि आपला पक्ष सार्वमताच्या मैदानात उतरला, तर लीग दंगली घडवून आणील. खानसाहेब यांची सार्वमतात भाग घ्यावा, अशी इच्छा होती. पण त्यांनी गफारखानांचा आग्रह मानला.

जुलैमध्ये सार्वमत घेण्यात आले व २७ जुलै १९४७ रोजी निकाल जाहीर झाला. एकूण मतदार ५,७२,७९८ होते. त्यापैकी २,८९,२४४ जणांनी पाकिस्तानला मते दिली. (बाकीच्यांनी मतदान केले नाही.) जर खानबंधूंनी बहिष्कार घातला नसता, तर सरहद्द प्रांत हिंदुस्थानमध्ये राहिलाही असता. कारण पाकिस्तानला फक्त ५०.४९% मते पडली होती.

(३) आपण वर पाहिले की, सरहद्द प्रांतावर पाणी सोडताना काँग्रेसनेत्यांना मौंटबॅटनकडून वचन मिळाले होते की, स्वतंत्र भारतात जी संस्थाने आहेत, त्यांना भारतात विलीन होण्यासाठी मौंटबॅटन आग्रह करील. मौंटबॅटनने आपला शब्द पाळला. १४ ऑगस्ट १९४७ पर्यंत काश्मिर, हैद्राबाद आणि जुनागड ही संस्थाने वगळता बाकीच्या संस्थानांनी भारतात विलीन होण्याची तयारी दाखविली होती. काश्मिरच्या बाबतीत मौंटबॅटनच नव्हे तर हिंदुस्थानाशी संबंधित अशा सर्वच ब्रिटिश अधिकाऱ्यांचा तोरा होता की, काश्मिर पाकिस्तानातच विलीन होईल. (३३०)

१७ जून १९४७ ला मौंटबॅटन श्रीनगरला गेला. त्याने काश्मिरचे संस्थानिक राजा हरिसिंग यांना सांगितले की, "तुम्ही हिंदुस्थान किंवा पाकिस्तान या पैकी कोणत्याही देशात विलीन होऊ शकता. मला हिंदुस्थानच्या नेत्यांनी सांगितले आहे की, तुम्ही पाकिस्तानात जायचे ठरविले तरी त्यांना (हिंदी नेत्यांना) वाईट वाटणार नाही." (३४४). राजा हरिसिंगांचे - इतर मोठ्या संस्थानिकांप्रमाणेच - मत होते की, काश्मिर स्वतंत्रच राहावे. पाकिस्तानात विलीन होण्याची त्यांना अजिबात इच्छा नव्हती. हिंदुस्थानात विलीन होणे त्यांना नकोसे वाटत होते ते यासाठी की, शेख अब्दुल्ला हा आपला कट्टर शत्रू आहे, अशी




त्यांची खात्री होती व अब्दुल्ला हा नेहरूंचा परममित्र होता. आपल्याला स्वतंत्र राहाण्याचा पर्याय नाही हे कळून हरिसिंग खट्टू झाले व त्यांनी मौंटबॅटनशी गंभीर चर्चा करण्याचे टाळले. नंतर मौंटबॅटनचा सहकारी लॉर्ड इस्मे १५ ऑगस्ट ४७ रोजी श्रीनगरला गेला व तेथे त्याने हरिसिंग यांना पाकिस्तानात विलीन होण्याविषयी पुनःपुनः सूचना केली. पण हरिसिंगांनी कानाडोळा केला. नंतर मौंटबॅटनला वाटू लागले की, हरिसिंगांची इच्छा हिंदुस्थानात विलीन होण्याची असावी. म्हणून त्याने काश्मिरच्या दिवाणांना सांगितले की, काश्मिरी जनतेचे सार्वमत घेऊनच काय तो निर्णय करा.

खुद्द जिनांना वाटत होते की, काश्मिरमधील सार्वमत पाकिस्तानला अनुकूल असणार नाही. काश्मिरी मुसलमान हे पंजाबी मुसलमानांपेक्षा निराळे आहेत. त्यामुळे त्यांनी काश्मिरवर आदिवासी टोळीवाल्यांनी आक्रमण केल्याचा बनाव रचला. त्यानंतर राजा हरिसिंग यांनी भारतात विलीन होण्याचा करार केला. नंतर भारतीय लष्कर काश्मिरात गेले व त्यांनी टोळीवाल्यांकडून (व पाकिस्तानी लष्कराकडून) काश्मिर सोडविण्याचा उपक्रम केला, हा इतिहास सर्वज्ञात आहे.

काश्मिरचे दोन भाग इंग्रजांच्या दृष्टीने फार महत्त्वाचे होते. पहिला भाग म्हणजे काश्मिरचा अति-उत्तरेचा भाग गिलगिट. १९३५ साली काश्मिर संस्थानाने या प्रदेशाचा कारभार ६० वर्षांच्या कराराने ब्रिटिशांकडे सोपवला होता. इंग्रज सरकारने हा कारभार त्यांच्या संस्थानी खात्याकडे (पोलिटिकल डिपार्टमेंट) दिला होता. तेथे इंग्रजांचे सैन्यही होते. त्या सैन्याला 'गिलगिट स्काऊट्स' असे म्हणत. १ ऑगस्ट १९४७ ला इंग्रज सरकारने हा भाग काश्मिर महाराजाकडे परत केला. महाराजाने ब्रिगेडियर घन्सारा सिंग नावाचा माणूस तेथील कारभार पाहण्यास पाठविला. गिलगिट स्काऊटचे अधिकारी मेजर ब्राऊन व कॅप्टन मॅथसिन आता घन्सारा-सिंगाच्या आधिपत्याखाली आले. तथापि, ते दोघे गिलगिट-मधील घडामोडींचा अहवाल सरहद्द प्रांतातील खैबर येथील इंग्रज अधिकाऱ्यांकडेच पाठवीत राहिले. १४ ऑगस्टला खैबर येथील अधिकारी पाकिस्तानचे नोकर बनले. ऑक्टोबर १९४७ मध्ये काश्मिरने भारताशी विलिनीकरणाचा करार केल्यावर ३१ ऑक्टोबरला ब्राऊन व ॲथसिन या दोघांनी घन्सारासिंगाला अटक केली व पाकिस्तानला कळविले की, गिलगिट पाकिस्तानचे झाले आहे. त्यानंतर ब्राऊनला १९४८ साली इंग्लंडच्या राजाने ओ. बी. ई. हा किताब दिला. ऑक्टोबर १९४७ पासून डिसेंबर १९४८ पर्यंत १४ महिने लढाई चालली; परंतु, भारतीय सैन्याच्या हाती गिलगिट पडू शकले नाही! इंग्रजांनी (भारतीय लष्कराचे अधिकारी तेव्हा इंग्रजच होते) हे होऊ दिले नाही. गिलगिट हा फार मोक्याचा प्रदेश आहे. तेथून रशिया, अफगाणिस्तान, चीन या सर्व देशांवर हल्ले करणे शक्य आहे. आपल्याला अनुकूल असणाऱ्या पाकिस्तानच्या हवालीच हा भाग असावा, असा इंग्रजांचा हेतू होता. नरेंद्र सिंगांचे म्हणणे आहे की, गिलगिटसंबंधात भारताचे लष्करी व परराष्ट्रीय धोरण कायमच संदिग्ध राहिले. (३३७)

पाकिस्तानी पंजाब व काश्मिर यांच्या सीमेवर नौशेरा ते मुझफराबाद अशी एक पट्टी काश्मिरच्या अखत्या-रीतली होती. पाकिस्तान टोळी-वाल्यांनी हा भाग जिंकून घेतला. तो भाग सोडवून घेण्याच्या अनेक योजना हिंदी अधिकाऱ्यांनी १९४८ साली तयार केल्या. पण त्या योजना (आता भारत सरकारच्या नोकरीत असलेल्या) वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्यांनी उधळून लावल्या. त्या वेळी भारतीय सैन्याचा सर्वोच्च अधिकारी जनरल रॉम बुचर हा होता व पाकिस्तानी सैन्याचा अधिकारी जनरल ग्रेसी हा होता. दोघांच्याही वर दोन्ही सैन्यांचा (भारतीय व पाकिस्तानी) मुख्याधिकारी फील्ड मार्शल क्लॉड ऑकिन-लेक हा होता. हे तिघेही अधिकारी पाकिस्तानला अनुकूल होते. नौशेरा ते मुझफाराबाद हा मुलूख पाकिस्तानच्या संरक्षणासाठी फार मोक्याचा होता. म्हणून तो भारताच्या हाती पडू नये, यासाठी सर्व प्रयत्न या तिघांनी केले.

(९)

नरेंद्र सिंगांनी हिंदुस्थानच्या फाळणीची 'अकथित कथा' सांगितली आहे, तिचा विस्तृत आढावा आतापर्यंत घेतला.

दुसरे महायुद्ध सुरू होताच लिनलिथगोने जिना व लीग यांना उत्तेजन देऊन काँग्रेसच्या स्वातंत्र्य चळवळीला उतारा म्हणून एक प्रतिपक्ष निर्माण केला. हिंदुस्थान








अखड राहिला असता तर तो इंग्रजांना नको होता, असे नाही; पण महायुद्धानंतर जी भू-राजकीय परिस्थिती असेल, त्या परिस्थितीत तो आपल्याला अनुकूल राहील तर हवा होता. तथापि, काँग्रेसच्या आकांक्षा काही वेगळ्या आहेत हे कळून आल्यावर अखंड हिंदुस्थानाचा भू-राजकारणाच्या दृष्टीने मोक्याचा जो वायव्येकडील भाग तो वेगळा करावा आणि तेथे आपल्याला लष्करी तळ उभारण्याचे अधिकार असावेत, असे इंग्रजांना वाटू लागले व त्यांनी फाळणी घडवून आणली, हा या कथेचा सारांश आहे. नरेंद्र सिंगांचे असेही म्हणणे आहे की, अमेरिकेची सहानुभूती काँग्रेस व अखंड हिंदुस्थान यांच्या बाजूने होती. तिकडे काँग्रेसच्या नेत्यांनी दुर्लक्ष केले.

**टीप :** कंसातील आकडे पुस्तकातील पानांचे आहेत.














संजय उवाच –

## अण्णांच्या आन्दोलनाचा इत्यर्थ

"वत्स संजया, ये. तुझे स्वागत असो. तू अंगाला कस्तुरी लावलेली असतेस. तिचा वास फार लांबून येतो. मी द्वारपालाला सांगितले होते की, तू आलास की तुला तात्काळ आत पाठवून द्यावे. अनुज्ञा घेण्याची वाट पाहू नये. ये, बैस. ही फळे घे."

"हे तात, हे कौरवेश्वरा, इतक्या त्वरेने मला बोलावून घेण्याचे प्रयोजन काय झाले? आपली मनःस्थिती ठीक दिसत नाही. चेहरा उदासीन दिसतो आहे व दृष्टिहीन डोळ्यांत चिंता झाकळून आली आहे. आपणास काही कुवार्ता तर कळली नाही ना?"

"बाळा संजया, आज प्रातःकाळीच देवर्षी नारद राजप्रासादात येऊन गेले. पाद्यपूजा व मधुपर्क झाल्यावर त्यांनी आपल्या भारतवर्षातील घडामोडींची माहिती दिली. ती ऐकल्यापासून मी अस्वस्थ झालो आहे. आपल्या भारतवर्षीय प्रजेने प्रभूत परिश्रमांनी तयार केलेली घटनेची संहिता व त्या संहितेनुसार निर्माण झालेली संसद या दोघांनाही राळेगण नामक गावातील अण्णा हजारे नावाच्या मनुष्याने सुरू केलेल्या आंदोलनाने आव्हान दिले आहे. आम्ही सांगू तशाच स्वरूपाचे लोकपाल-विधेयक संसदेने पारित केले पाहिजे, अशा गर्जना देत तो उपटसुंभ मनुष्य एका पटांगणात प्रायोपवेशन करण्यास बसला आहे. त्याला साहाय्य करीत लक्षावधी आबालवृद्ध आणि स्त्रिया गावोगावी प्रभात यात्रा तर सायंकाळी मेणबत्ती-यात्रा काढीत आहेत व एकंदर अराजक माजविण्याचे कारस्थान घडत आहे, असे त्या विष्णुभक्त नारदाने सांगितल्यानंतर भारताच्या भवितव्याविषयी, हे दिव्यचक्षू संजया, मी अतिशय साशंक झालो आहे. देवर्षींचा स्वभाव मी जाणून नाही असे नाही. कोणतीही वार्ता अतिरंजित करून सांगण्याची त्यांची वृत्ती माझ्या लक्षात आली आहे. तुझ्याकडून नेमकी, नेटकी व सविस्तर माहिती मिळेल म्हणून मी तुझे स्मरण केले. तूही तात्काळ आलास, याची धन्यता वाटली."

"महाराज, देवर्षी हे त्रिकालज्ञ आहेत व हरिकीर्तनाच्या निमित्ताने त्यांच्या त्रैलोक्यात संचार होत असतो हे खरे; पण मी विनम्रभावाने सांगतो की, महर्षी व्यासांनी मला जी दिव्यदृष्टी दिली आहे व कोठलेही संभाषण ऐकण्याची श्रवणशक्ती दिली आहे, त्यांच्या योगाने मला सर्वांगीण माहिती कळत असते. मला वाटते की, नारदमुनी नुकतेच भारतात कीर्तनयात्रा करून आले आहेत. त्या धामधुमीत त्यांनी वर्तमानपत्रांवर दृष्टी टाकून काही विवेचन वाचले व आपले मत बनविले. दिव्यदृष्टी नसल्याने व सवड न मिळाल्याने त्यांनी चित्रवाणीवरील कार्यक्रम पाहिले नाहीत. त्यामुळे त्यांचे काही एकांगी मत बनले असावे. सध्या भारतात मुद्रणमाध्यमे व चित्रवाणी–माध्यमे यांच्यात घोर स्पर्धा चालू आहे. चित्रवाणी माध्यमांनी महात्मा अण्णा हजारे यांच्या आंदोलनाला फार मोठी व गौरव करणारी प्रसिद्धी दिली. मुद्रण माध्यमांनी वार्तापत्रांतून अण्णांच्या उपोषणाला व त्यांना समाजाकडून मिळणाऱ्या पाठिंब्याला नाखुशीने का होईना, पण प्रसिद्धी दिलीच; तरी आपल्या अग्रलेखांतून व स्तंभलेखांतून त्यांनी अण्णा व त्याहीपेक्षा त्यांचे सहकारी यांना फुफाट्यावरून ओढले, असेच म्हणावे लागेल. हे खरे आहे की, अग्रलेख, स्तंभलेख वाचणारे फारच थोडे लोक असतात. पण चित्रवाणीवर ज्या चर्चा झाल्या, त्यात मुद्रण माध्यमांचे लोक भाग घेत होते व आन्दोलनविरोधी सूर लावत होते."

**संसद विरुद्ध अण्णा**

"प्रज्ञावंता संजया, मला सांग की, अण्णा भारताच्या सार्वभौम संसदेवर कुरघोडी करून व आपल्या उपोषणाची बंदुक रोखून आपल्याला पाहिजे ते विधेयक संमत करून घेत आहेत, हे कितपत खरे आहे? अखेर संसद ही लोकप्रतिनिधींची सभा आहे. अण्णांना जे मांडावयाचे आहे,९ ते आपल्या प्रतिनिधीच्या माध्यमातून ते संसदेपुढे ठेवू शकत नाहीत का? बाबा रे, लोकसत्ताक राज्यात चर्चेने निर्णय घ्यावयाचे असतात. विधेयके चर्चेतूनच बहुमत







निर्माण करून संमत केली जातात. प्रत्येकाला आपले मत व्यक्त करण्याचा पूर्ण अधिकार असतो. महात्मा गांधी सत्याग्रह, असहकार, उपोषण इत्यादी मार्ग वापरत होते खरे; पण ते परकीय राज्यकर्त्यांच्या विरुद्ध. हे गावगणपुत्रा, ज्यांना जनतेने आपले मतदानस्वातंत्र्य वापरून प्रतिनिधित्व दिले आहे, असे संसदसदस्य जे जनतेला मान्य नाही, असे विधेयक पारित करतीलच कसे? मला तरी हा व्याघातच वाटतो. तरी हे सूता, तूच माझ्या या शंकेचे सविस्तर निवारण कर."

"हे महाबाहो, तुझा प्रश्न अगदी योग्य आहे. पण असे अनेकदा झाले आहे की, संसद-सदस्यांवर त्यांचे नेते काही निर्णय लादतात. सदस्यांना निरनिराळ्या निर्बंधां-मुळे मोकळी चर्चा करता येत नाही. स्वतःची मते बाजूला ठेवावी लागतात. पंडित नेहरूंच्या काळात संसदीय काँग्रेस-पक्षाच्या सभा वारंवार होत. प्रत्यक्ष संसदेत नाही तरी या पक्षीय सभेत प्रतिनिधी आपली मते मोकळेपणाने मांडत. काही वेळा असेही झाले आहे की, संसदेत विधेयक मांडल्यावरही त्यात मूलभूत बदल सदस्यांनी घडवून आणले होते. हे दीर्घस्मृते, ख्रिस्ताङ्क १९५६ मध्ये शासनाने भाषावार-प्रांतरचना-विधेयकात गुजरात-मुंबई-महाराष्ट्र असे त्रिभाजन करणारी सूचना मांडली होती. पण चर्चेच्या ओघात सभासदांनी महाद्विभाषिक राज्याचा प्रस्ताव आणला व तो शासनाने स्वीकारला. अशाही विधेयकाला कै. काका गाडगीळ यांनी विरोध तर केलाच, पण विरोधी मतदानही केले! पक्षांतरबंदीचे विधेयक पारित झाल्यापासून अशा तऱ्हेचे विरोधी मतदान केले, तर त्या सभासदाला संसदेचा राजीनामा द्यावा लागतो. सारांश, कोणताही प्रस्ताव संसदेपुढे आला की, प्रस्तावाच्या बाजूने किती सदस्य आहेत, विरोधी किती सदस्य आहेत, हे आपोआप ठरलेलेच असते."

"हे सूता, असे असेल तर संसदेतील चर्चा वांझोटीच म्हणावी लागेल. अखेर, चर्चा करायची ती समोरच्याचे मत बदलण्यासाठी करायची असते. पण मते जर अगोदरच ठरलेली असतील आणि एखाद्या सदस्याचे मतपरिवर्तन होऊनही ते विधेयकावरील त्याच्या मतदानातून प्रकट होणार नसेल, तर ती चर्चा म्हणजे व्यर्थ शब्दजाळच म्हटले पाहिजे."

"हे राजनीतिज्ञ नरेशा, तू खऱ्या दुखण्यावर नेमके बोट ठेवले आहेस. पक्षांतर-बंदी-विधेयक पहिल्यांदा मांडले गेले, तेव्हा कै. मधू लिमये यांनी हीच टीका केली होती की, संसदसदस्याचे विवेकस्वातंत्र्य हिरावून घेणारे हे विधेयक आहे. कै. राजीव गांधींच्या कारकिर्दीत व त्यांच्या प्रेरणेने पक्षांतरबंदीचा कायदा झाला व गंमत म्हणजे त्यांच्या मातोश्री इंदिराबाई गांधी यांनी 'विवेकाने मतदान करण्याचे स्वातंत्र्य' ही घोषणा देऊन स्वपक्षाचे संजीव रेड्डी यांचा पराभव घडवून आणला होता! यानंतरच त्या पक्षाच्या सर्वेसर्वा बनल्या! आता स्थिती अशी आली आहे की, राज्यसभेसाठीच्या निवडणुकीत विधानसभा सदस्यांना आपली मतपत्रिका पक्ष-प्रतोदाला दाखवून त्याची खात्री पटवून मगच मतदान करावे लागते. तेव्हा विधिमंडळांचे सदस्य हे पक्षाच्या दावणीला बांधले गेले आहेत. संसदेतील चर्चा ही सफळ व्हायची असेल, तर प्रत्येक सदस्याची मतपरिवर्तन करून घेण्याची तयारी असायला हवी."

"संजया, तुझे म्हणणे यथार्थ आहे. संसदेतील चर्चेला असे गौण स्वरूप आल्यामुळेच सदस्य चर्चेच्या वेळी अनुपस्थित राहतात. महत्त्वाची विधेयके पळभरात पारित केली जातात. आणि संपूर्ण अधिवेशनच एक दिवसही चर्चा न होता वाया गेल्याचे ऐकिवात येते. लोकसत्तेचा प्राण म्हणजे चर्चा; तीच अशी प्रभावहीन झाल्यावर संसद म्हणजे केवळ देखावाच म्हणावा लागेल."

"अगदी खरे आहे. हे राजेंद्रा, अण्णांचे हे कौतुक म्हणावे लागेल की, त्यांच्या प्रायोपवेशनाची समाप्ती करण्याच्या हेतूने का होईना, एका प्रस्तावावर ४-५ प्रहर अतिशय विधायक चर्चा झाली. लोकपाल विधेयकात कोणते मुद्दे यावेत, याची स्थायी समितीला सूचना देण्यात आली. नंतर अण्णांनी आपले प्रायोपवेशन संपुष्टात आणले."

### कोण जिंकले; कोण हरले?

"बाळा संजया, नारदमुनी मला सांगत होते की, संसदेने खरेतर अण्णांच्या तोंडाला पानेच पुसली आहेत. दिल्लीतील कोणी पत्रपंडित त्यांना म्हणाला की, 'लोकसभेने अण्णांच्या तीन सामान्य मागण्यांना सैद्धान्तिक मान्यता दिली आणि सभागृहाच्या भावनांसह त्या मागण्या संसदेच्या

स्थायी समितीकडे पाठवून दिल्या. हजाऱ्यांचे उपोषण सुटावे, गर्दी घरोघरी परतावी, यासाठी करण्यात आलेला तो सभ्यपणाचा उपचार होता.' असे जर असेल तर ती चलाखी अण्णा व त्यांचे चाणाक्ष साथीदार यांच्या ध्यानात आली नाही काय? की, अण्णाही उपोषण सोडण्यासाठी घायकुतीला आले होते?"

"हे राजेंद्रा, मी तुला सुरुवातीलाच म्हणालो की, चित्रवाणी आणि वृत्तपत्रे यांनी अण्णांच्या चळवळीबद्दल परस्परविरोधी भूमिका घेतल्या. अण्णांचे आंदोलन हे चित्रवाणी उद्योगाला पर्वणीसारखे वाटले. दर्शकांना घटका-घटका बांधून ठेवणारे एक मोठे प्रदर्शनच त्यांना सापडले. चित्रवाणी वाहिन्यांनी आंदोलन उचलून धरले. लाखो लोक एकत्र आले आहेत, 'मी अण्णा आहे' अशा टोप्या घालून, मेणबत्त्या पेटवून, संध्याकाळच्या वेळी नगरा-नगरांतील राजरस्त्यांवरून हिंडत आहेत, राजधानी दिल्लीत तिहार कारागृहाबाहेर, रामलीलेच्या पटांगणात जमा होऊन घोषणा देत आहेत, हे सगळे देखावे रोमांच आणणाऱ्या वर्णनासकट ते प्रेक्षकांपुढे मांडत होते. मुद्रितमाध्यमांना हे धावते वर्णन करता येणे अशक्य होते. त्यातून पत्रपंडित व संसदसदस्य किंवा राजकारणी यांचे नाते परस्पर-सहायकत्वाचे असते. या पत्रपंडितांना राजकारणी लोक मेजवान्या देतात, गुप्त माहित्या पुरवितात; शासकीय योजनेतून दिल्ली, मुंबई, चेन्नईसारख्या महाग नगऱ्यांमधून सदनिका मिळवून देतात. कित्येक पत्रपंडित तर धन व सत्ता यांनी मंडित असणाऱ्या राजपुरुषांकडून प्रत्येक मासाला समांतर वेतन घेतात, असेही सांगितले जाते. काही वृत्तपत्रे राजकारण्यांच्या मालकीचीच आहेत. अण्णा, त्यांचे साथीदार व वृत्तवाहिन्यांचे घरोघर असणारे प्रेक्षक हे संसदेचे व राजकारण्यांचे शत्रू आहेत असे भासवून अण्णांच्या आंदोलनाची अवहेलना करायची व आपले पोशिंदे जे राजकारणी त्यांची तळी उचलून धरायची, असा या पत्रकारांचा वसा होता. अशाच कोण्या पत्रकाराने नारदमुनींना आपल्या तिरकस बुद्धीचा हा प्रसाद वाटला असेल."

"संजया, तू म्हणतोस तसे असेलही. सत्य व सामान्य प्रजा यांच्या दरम्यान मुद्रित-प्रसारमाध्यमे आणि चित्रवाणी माध्यमे यांनी एक मायाजाल उभे केले आहे आणि ते दाखवतात ती दृश्ये व प्रसृत करतात त्या वार्ता यांच्यातील खऱ्याखोट्याचा निवाडा करणे दुरापास्त असते. प्रसार माध्यमे, राजकारणी, चित्रपट तारे-तारका व क्रीडापटू यांचे मिळून एक तरल व तरंगते असे वेगळे विश्वच आहे. त्याकडे आसुसल्या नजरेने पाहायचे व आपण क्षुद्र आहोत हे स्वतःला पटवून द्यायचे, इतकेच सामान्यांच्या हातात आहे. पण माझ्या वार्धक्यामुळे मी वाहवत गेलो. हे गावगणा, मला सांग की, त्या महात्म्या अण्णांनी प्रायोपवेशन संपवले, तेव्हा त्यांच्या हाती नक्की काय लागले होते?"

"हे भारता, तुला नारदमुनींनी सांगितलेच असेल की, महात्मा अण्णा हजारे यांनी उपोषण सुरू केले तेव्हा त्यांच्या तीन मागण्या होत्या. शासनाने जे लोकपाल विधेयक मांडले आहे त्याच्या ऐवजी अण्णा व त्यांचे सहचारी यांनी तयार केलेले जनलोकपाल विधेयक संसदेने चर्चेला घ्यावे. ते विधेयक जसेच्या तसे आणि तेही ३० ऑगस्टपूर्वी पारित करावे. प्रत्यक्षात लोकसभेने २७ ऑगस्टला जो प्रस्ताव मान्य केला त्यात म्हटले आहे की, 'जे लोकपाल विधेय स्थायी समितीपुढे आहे त्यात खालील सूचनांचा समावेश व्हावा, यावर सभागृहाची सहमती आहे. एक, प्रत्येक शासकीय कार्यालयात 'नागरिकांची सनद' लावलेली असावी. त्या सनदेमध्ये कार्यालयातील सेवकांची नावे, प्रत्येकाचे काम, काम करण्याला लागणारा वेळ ही माहिती नमूद केलेली असावी; दोन, सर्व शासकीय कर्मचारी लोकपालाच्या चौकशीच्या कक्षेत यावेत; तीन, सर्व राज्यांत लोकायुक्त नेमण्यात यावेत.' हा प्रस्ताव पारित झाल्यावर त्याची प्रत अण्णांना देण्यात आली. दुसऱ्या दिवशी म्हणजे २८ ऑगस्टला अण्णांनी उपोषण सोडले."

"संजया, नारदमुनींनी ही हकीकत मला मोघम स्वरूपात सांगितली होती, हे खरे. पण तू आता ती नेमक्या रीतीने सांगितलीस. आता सगळा उलगडा झाला. पण हे महानुभावा, तुझ्या भाषणातून हे स्पष्ट झाले की, अण्णांच्या मागण्यांपैकी फारच थोड्या मागण्या मान्य झाल्या आहेत. मला देवर्षी म्हणाले होते की, पंतप्रधान व न्यायाधीश यांची चौकशी करण्याचा अधिकार लोकपालाकडे असावा, अशी अण्णांची मागणी होती. त्याचा

यात कोठेच उल्लेख नाही. दिल्लीच्या त्या पत्रपंडिताचे मत खरे दिसते. यात अण्णा व त्यांचे पाठीराखे यांची काहीच सरशी झाल्याचे दिसत नाही. मग या चळवळ्या लोकांनी विजयोत्सव कशासाठी केला."

"राजा धृतराष्ट्रा, चळवळीला स्वतःची एक दिशा व गतिशीलता असते. अण्णांची चळवळ ही महात्मा गांधींच्या सत्याग्रही चळवळीच्या धर्तीची चळवळ आहे. गांधीजींनी १९३० साली कायदेभंगाची विराट चळवळ केली. चळवळीचे कारण होते काँग्रेसने केलेला 'संपूर्ण स्वातंत्र्या'चा ठराव. महात्माजींनी दांडीयात्रा सुरू केली तेव्हा मागण्यांची जी यादी दिली, तीत स्वातंत्र्याचा उल्लेखही नव्हता. शेवटी राजप्रतिनिधी आर्यविन याच्याशी वाटाघाटी झाल्या तेव्हा मूळ यादीतील एकही मागणी मान्य झाली नाही. समुद्राकाठी राहणाऱ्या लोकांना स्वतःच्या उपयोगा-पुरते मीठ तयार करण्याची परवानगी मिळाली इतकेच. पण महात्म्याच्या सर्व अनुयायांनी तेव्हाही त्यांच्या परीने विजयोत्सव साजरा केलाच होता. त्याच्याशी तुलना करता अण्णांनी जे मिळविले, ते केवढेतरी जास्त आहे. कपिल सिब्बल, चिदंबरम् वगैरे मंत्र्यांची पहिली भूमिका अशी होती की, अण्णा आणि त्यांचे साथीदार संसदेला धमकी देत आहेत. त्यांना आपले म्हणणे संसदेवर लादण्याचा कोणताही विधिदत्त अधिकार नाही. कपिल सिब्बल तर अण्णांविषयी तुच्छतेने म्हणत होते की, 'अण्णाला घटना म्हणजे काय, हे कळते तरी का?' विरोधी पक्षांना अण्णांकरवी राज्यकर्त्यांची 'छी थू' झाल्याची गंमत पाहायचीच होती. पण त्यांची अण्णांच्या लढ्याविषयीची भूमिका मोघमच होती. अण्णांना तुरुंगात टाकले की आकाशातील अभ्रे वितळावीत तसे आंदोलन विरघळून जाईल, असाही शासनाचा आडाखा होता. पण पत्रपंडित आता काहीही म्हणत असले तरी आणि त्यांच्या म्हणण्याचा देवर्षीवर काही प्रभाव पडला असला तरी, हे खरेच आहे की, गेल्या चाळीस वर्षांत झाले नव्हते असे आसेतु-हिमाचल आंदोलन उभे राहिले. या शांततापूर्ण रीतीने चाललेल्या चळवळीने रोमांचकारी रूप धारण केले. साध्यासुध्या घर-गृहस्थीत आयुष्य काढणाऱ्या माणसांना नवा विश्वास दिला की, तुमच्या आशा-आकांक्षांनाही काही मूल्य आहे व ते तुम्ही पदरात पाडून घेऊ शकता. अशा आंदोलनांचे यशापयश वृत्तपत्रकारांच्या कोर्दखतावणी-तून हिशेब करून ठरवायचे नसते. त्याची मोजमापे वेगळीच असतात."

**चळवळीचा मूलस्रोत**

"सूतपुत्रा, तू झालेल्या गोष्टींचे तपशीलवार तरीही नेमके वर्णन करतोस, याचा मला उत्तम अनुभव त्या कुलक्षयकारी व दारुण युद्धाचे वर्णन तू सांगितलेस तेव्हा आला होताच. त्या वेळी झाल्या प्रसंगावर तू जी भाष्ये करायचास, ती अनेकदा माझ्या हृदयाला घरे पाडणारी असली तरी अंततः शहाणपणाची होती, हेही मला नंतर कळून आलेच. आताही त्या महात्मा अण्णांच्या आंदोलनाचे जे वृत्त तू तुझ्या टिपण्यांसह सांगितलेस, त्यामुळे माझे बरेच प्रबोधन झाले आहे. पण हे बुद्धिमंता, मला असे सांग की, इतकी मोठी चळवळ उभी राहिलीच कशी? काही 'पुरोगामी' म्हणविणारे विचारवंत गेली कित्येक वर्षे 'चंगळवादामागे लागलेला' अशी ज्या मध्यमवर्गाची हेटाळणी करीत होते, त्याच मध्यमवर्गीय कुटुंबांतील महाविद्यालयातून जाणाऱ्या मुले-मुली आपले उपाहार-गृहातील अड्डे मोडीत काढून कोपऱ्या-कोपऱ्यावर धरणे धरून बसली, हा काय चमत्कार आहे? खेडेगावांतील शेतकरी आपल्या जनावरांच्या पाठींवर मंत्र्यांची नावे लिहून त्या जनावरांसकट मिरवणुकीने हिंडत होते, हे खरे आहे काय? काँग्रेसपक्षाच्या किंवा दुसऱ्याही पक्षांच्या पदयात्रांना दैनिक भत्ता देऊन माणसे गोळा करावी लागतात, असे ऐकून होतो. इथे ही माणसे अण्णांच्या चळवळीत कोणताही मोबदला न घेता कशी सामील झाली? की, त्यांनाही कोणी पैसे वाटले होते? परदेशी संस्थांनी भारता-तील अशासकीय सेवासंस्थांना पैसे पुरविले व त्या देशी संस्थांनी अण्णांच्या चळवळीसाठी पैसे वाटले, हे खरे आहे का? बाळ संजया, अशा नानाविध प्रश्नांचा विचार करून माझ्या मस्तकात काहूर उठले आहे. माझ्या शंकांचे निवारण तूच काय तो करू शकतोस."

"हे नरोत्तमा, तुझ्या या सर्व प्रश्नांचे मी यथाशक्ति निराकरण करतो, ते तू लक्षपूर्वक ऐक. कारण की, हे कौरवेश्वरा, या सर्व शंकांचा काथ्याकूट पुरोगामी विचारवंत आणि पत्रपंडित नाना बाजूंनी करीत आहेत. हे राजश्रेष्ठा, गेल्या वर्ष-सहा महिन्यांत भारतातली परिस्थिती नोकरदार

वर्ग, गरीब प्रजा आणि ग्रामीण जनता या सगळयांच्याच दृष्टीने फार प्रतिकूल होत गेली. शासनाने सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार पगारदारांना घवघवीत वाढ दिली खरी; पण त्यामुळेच महागाई अतोनात वाढली. पगारदारांना मिळालेली वाढ महागाईने खाऊन टाकली; तर ज्यांना वेतनवाढ मिळालीच नव्हती, ते होरपळून गेले. अन्नधान्ये, भाज्या, फळे, इंधने यांच्या किंमती आवाक्याच्या बाहेर गेल्या. ग्रामीण भागात नोकऱ्या नाहीत. नोकरी मिळण्यासाठी लाख-लाख रुपये द्यावे लागतात. महागाईवाढीचा दर कमी करण्यासाठी सरकारने व्याजाचे दर वाढवले. कर्जे महाग झाली. राहाण्यासाठी घरे – बहुशः सदनिका – विकत घेणे अशक्यच होते; पण भाड्याने राहायचे तर भाडीही फार वाढली. लोक अगदी गांजून गेले. त्यातच भ्रष्टाचाराची निरनिराळी प्रकरणे बाहेर येऊ लागली. शिक्षा अजून कोणालाच झालेली नाही; पण सर्व संशयित व्यक्ती या राजकारणी होत्या. साहजिकच लोकांना राजकारणी या सर्व नासक्या कारभाराचे धनी वाटू लागले. त्यातच मंत्रिमंडळाने लोकपाल-विधेयक संसदेत मांडण्याचे ठरविले. अण्णांनी त्याच्या विरोधात जनलोकपाल विधेयकाचा मसुदा तयार केला. अण्णा सांगू लागले की, लोकपाल-विधेयक हा धूळफेकीचा प्रकार आहे. त्याने भ्रष्टाचारी पकडले जाणार नाहीत तर सुटतील. बहुतेक नागरिकांनी लोकपाल विधेयक वाचले नव्हते व जनलोकपाल विधेयकाचीही माहिती त्यांना नव्हती. पण स्फोटकांच्या ढिगाऱ्यावर ढिणगी पडावी तसे झाले. राजकीय नेते, शासकीय यंत्रणा, उद्योगपती व या सगळ्यांनी एकत्र येऊन उभे केलेले कवटाळ यांच्या समोर आपण कःपदार्थ आहोत असे वाटणाऱ्या नागरिकांना आपली अस्मिता व्यक्त करण्याचा मार्ग सापडला व ते अण्णांच्या 'आपण देशाचे मालक आहोत' या घोषणेकडे आकर्षित झाले. पुरोगामी पत्रपंडितांनी आजही या आंदोलनाची 'कुंभमेळा' किंवा 'गणेशोत्सव' अशी टवाळी चालविली आहे; पण त्या टवाळीमुळे विचलित न होता, चा चळवळीने देशातील लाखो लोकांचा स्वाभिमान फुंकर घालून धगधगता केला, हे सत्य लक्षात घेतले पाहिजे. चित्रवाणी माध्यमांनी त्यांच्या रीतीप्रमाणे या चळवळीला जी महोत्सवी प्रसिद्धी दिली, तिच्यामुळे चळवळीला दिखाऊ स्वरूप आले; पण त्यामुळे चळवळकऱ्यांच्या प्रामाणिक भावनेला बट्टा लावता येत नाही.

"हे प्रभो, भारतातील पक्षांना, चळवळींना व राजकारण्यांना परदेशांतून पैसे मिळतात, असे आरोप स्वातंत्र्यपूर्व काळापासून होत आलेले आहेत. साम्यवादी पक्षांना साम्यवादी रशियाकडून प्रत्यक्ष-परोक्ष मार्गांनी पैसे मिळत असत. शासनाच्या गुप्तचर यंत्रणांकडे त्याचे पुरावे असले पाहिजेत. पण शासनाने असे दस्तऐवज कधीच प्रकाशात आणले नाहीत. श्रीमती इंदिरा गांधी यांच्या आधिपत्याखाली असलेल्या काँग्रेस पक्षाला रशियातून रुपयांनी भरलेल्या पेट्या दिल्या जात असा, आरोप साम्यवादी रशियाचे पतन झाल्यानंतर त्या रशियाच्या गुप्तचर यंत्रणेतील एका अधिकाऱ्याने केला. त्याचे पुस्तकही प्रसिद्ध झाले. पण विरोधी पक्षांनीही या प्रकरणाची पुरती शहानिशा व्हावी, असा आग्रह धरला नाही. जयप्रकाशजींनी 'संपूर्ण क्रांती'चे वादळी अभियान हाती घेतले. त्यांना अमेरिकेकडून पैसा मिळत होता, असे काँग्रेस पक्षाचे नेते कंठरवाने सांगत. शासन काँग्रेस पक्षाच्या हातात होते. त्यांनी जयप्रकाशांविरुद्ध अभियोग का चालविला नाही? 'सर्व आंदोलनांमागे परदेशी पैसा असतो' अशा तऱ्हेचे धुके तरंगत ठेवायचे, हे सर्वच राजकीय पक्षांना सोयीचे असल्याने त्या धुक्यावर सत्यशोधनाचा प्रखर प्रकाशझोत टाकण्याचे सारेच जण टाळतात."

"हे दिव्यचक्षू संजया, तू केलेले विवेचन मला परिपूर्ण व यथार्थ वाटते. सच्चरित्र व जनसेवेतून लोकांसमोर आलेला माणूस सकृद्दर्शनी साधा व गबाळाही वाटला, तरी त्याच्या अंतर्यामी जागी झालेली प्रामाणिक कळकळ जेव्हा लोकांना हाक देते तेव्हा साधेसुधे, रोजच्या राहाटीत पिचून गेलेले, रोजच्या अन्यायाला व पिळवणुकीला शरण जाणारे लोक झडझडून जागे होतात, तेवढ्याशा ठिणगीने पेटून उठतात, हे वारंवार अनुभवाला आलेले आहे. स्वातंत्र्याचे झगझगीत स्वप्न सामान्य माणसाला प्रेरणा देण्याला पुरेसे ठरले नाही; त्याला गांधीजींनी तळमळीने दिलेल्या पुकाऱ्याची जोड द्यावी लागली. सत्तरीच्या दशकात बिहारात व गुजरातेत विद्यार्थी 'नवनिर्माणा'च्या चळवळी करीत होते. जयप्रकाशांचा परिसस्पर्श झाल्यावर त्या






चळवळींना 'संपूर्ण क्रांती'चे तेज आले. तीच गोष्ट आताही झाली. लोकांच्या मनात खदखदत असणारा अंगार अण्णांच्या चळवळीने उफाळून बाहेर आला व त्याने प्रत्येकाला जाणीव करून दिली की, तुझे चिमूटभर चैतन्यही इतरांच्या चैतन्यांशी एकरूप झाले तर देश हलवून सोडील. पण बाबा संजया, खंत एकच आहे."

"ती कोणती, महाराज?"

"आमच्या नागरिकांतील चैतन्य सततच जागरूक का राहत नाही? काळा-काळाने कोण्या असाधारण माणसाने त्याला हाक देऊन जागृत का करावे लागते?"

दि. १२/९/२००११



## लेखकांचा परिचय

❋ **अरुण विनायक जातेगांवकर व वासंती अरुण जातेगांवकर**

डॉ. अरुण जातेगांवकर व वासंती जातेगांवकर ह्या दोघांना अमेरिकेतील विद्यापीठांतून गणितात डॉक्टरेट पदव्या आहेत. त्या दोघांनी गणितावरील पाश्चात्त्य नियतकालिकांमधून संशोधनात्मक अनेक लेख लिहिले. २००१ साली सेवानिवृत्त होताना अरुण जातेगांवकर न्यूयॉर्कमधल्या फोर्डम् युनिव्हर्सिटीमध्ये गणिताचे प्राध्यापक होते आणि वासंती जातेगांवकर जर्सीमधल्या सीटन हॉल युनिव्हर्सिटीमध्ये संगणकशास्त्राच्या प्राध्यापिका होत्या. सेवानिवृत्त झाल्यापासून ती दोघे महाभारतावर वाचन व लेखन करत आहेत.

E-mail : vasantijategaonkar@yahoo.com

❋ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच्.डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.

***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४. दूरध्वनी : (०२०) २५६७४०९३.



अनुक्रमणिका

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**

# वैदिक संस्कृतीचा विकास

(तिसरी आवृत्ती, १९९६)

**प्रा. मे. पुं. रेगे यांच्या विवेचक पुरस्कारासह**

वैदिक संस्कृतीचा विकास ह्या बृहद् ग्रंथात शास्त्रीजींनी अधिकाराने आणि कौशल्याने आपल्या प्रदीर्घ सांस्कृतिक वारशाचे आत्मीयतेने पण चिकित्सकपणे परीक्षण केले आहे. त्यांच्या संस्कृत वाङ्मयाच्या व्यासंगाच्या व्याप्तीची कल्पना या ग्रंथावरून चांगली येते. वैदिक वाङ्मय, दर्शने, महाकाव्ये, शास्त्रे, पुराणे, बौद्ध व जैन साहित्य इत्यादी सर्व शाखांतील संस्कृत साहित्याचा त्यांनी आपल्या विवेचनात पुरेपूर उपयोग केला आहे. वैदिक संस्कृतीची समावेशक, उदार, विधायक बाजू त्यांनी उलगडून दाखविली आहे.

**डेमी आकाराची ३६+ ५७२ पृष्ठे** **किंमत रू. ३००/-**

**प्राज्ञपाठशाळा मंडळ**

३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा

अनुक्रमणिका

## लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका